५८०२७-

नवें जग, नवें भारत, नवी दृष्टि

आचार्य शं. द. जावडेकर

माझ्या जीवनाचें तात्त्विक अधिष्ठान

सेनापति पां. म. बापट

महाराष्ट्राच्या प्राचीन राजधान्या

प्रि. वा. वि. मिराशी

गुन्हेगार हे समाजाचे शत्रु आहेत कां ?

श्री. शं. शां. मो

युद्धकालीन नियंत्रणें व युद्धोत्तर योजना

प्रि. ध. रा. गाडगीळ

आर्यांची विवाहसंस्था

डॉ. के. ल. दप्तरी

हिंद विच्छेदनाची मीमांसा

श्री. हरी कृष्ण मोहनी

किंमत १ रुपया

आक्टोबर १९४९








नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अणुक्रमणिका






वर्ष पहिलें
अंक पहिला

# नवभारत

ऑक्टोब[र]
१९४७

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक मंडळ :

आचार्य शं. द. जावडेकर - आचार्य स. ज. भागवत - श्री. हरि कृष्ण मोहनी - प्रो. वि. म. वेडेकर



वार्षिक ९ रु. सहामाही ५ रु. अंकास १

मुद्रक व प्रकाशक : चिं. य. मराठे

मुद्रणस्थल : चित्रशाळा प्रेस, ...शिवाजीनगर पुणे २ । प्रकाशनस्थळ : नवभारत कचेरी, २१९





सर्वांचा महाराष्ट्रीय विचारवंतांनीं ऊहापोह केला पाहिजे. मात्र त्या तत्त्वांना तेथें जडलेली विकृति नष्ट करून त्यांच्या मूलभूत स्वरूपांतहि तीं महाराष्ट्रांत पेरलीं जातील व शुद्ध स्वरूपांत विकास पावतील असा प्रयत्न झाला पाहिजे. आणि महाराष्ट्राच्या संस्कृति-विषयक विचारांत योग्य दिसेल ती भर घातली पाहिजे. या विचारांनीं प्रेरित होऊन आम्ही या मासिकाच्या प्रकाशनाला आरंभ करीत आहों. विशिष्ट सांप्रदायिक दृष्टि न ठेवितां सांस्कृतिक उपासनेची व्यापक दृष्टि राखण्याचा आम्ही निर्धार केला आहे. या कार्यांत महाराष्ट्रांतील सर्व विचारवंतांचें सहाय्य मिळेल अशी आम्हांस आशा आहे.

## ' नवभारता 'ची भूमिका

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारें महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणें हें या मासिकाचें ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनीं स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठीं जें आपलें सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेलें असेल, उच्च वातावरणांतील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेनें संगृहीत केलेला असेल, त्याचें दिग्दर्शन हेंच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊं शकतें, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

ह्या मासिकांत येणाऱ्या लेखांत कोणत्याहीं विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतु नाहीं.

संचालक व संपादक-मंडळांतील सर्व व्यक्ति यांचेंही सर्व विषयांत मतैक्य आहे असें नाहीं. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यासंबंधीं सदृश अशा दृष्टिकोनानेंच त्यांना एकत्र आणलें आहे. तथापि प्रत्येकाचें व्यक्ति-वैशिष्ट्य व विचार-स्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेंच त्यांचें सह-कार्य राहील. प्रत्येक व्यक्ति आपल्या नांवानें प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

चालू विषयांसंबंधीं जे विचार प्रसिद्ध होतील, त्यांवर जेव्हां सही नसेल तेव्हां कार्यकारी संपादकाचें वैयक्तिक मत ते विचार प्रकट करितात असें मानलें जाईल.

मासिकांत प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणांत सत्यनिष्ठा, संयम, आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

शंकरराव देव



अणुक्रमणिका

# नव भारत, नवें जग आणि नवी दृष्टि

आचार्य शं. द. जावडेकर

सुमारें सव्वाशें वर्षांच्या परकीय अमलानंतर आज हिंदुस्थान स्वतंत्र होत आहे. इ. स. १८१८ सालीं हिंदुस्थान देशांत ब्रिटिश सत्ता सार्वभौम बनली आणि १९४७ च्या १५ ऑगस्ट रोजीं ही सार्वभौम सत्ता या खंडतुल्य राष्ट्राच्या सर्व विभागांतून नष्ट झाली. १८१८ सालापूर्वी या देशांत अनेक स्वतंत्र राज्यें नांदत होतीं व त्या सर्वांना आपलें सार्वभौमत्व स्वीकारावयास लावूं असा विश्वास मराठ्यांना १७५० च्या सुमारास वाटूं लागला होता असें म्हणतां येईल. पण ही गोष्ट करावयाची तर दिल्लीच्या मोगल बादशहाला पदच्युत करून नव्हे, तर त्याचे संरक्षक बनूनच व त्याच्या नांवानेंच आपणांस करतां येईल, अशी त्या वेळच्या सर्व कर्तबगार मुत्सद्यांची व लढवय्यांची कल्पना होती. राघोबादादांनीं अटकेवर भगवा झेंडा रोविला, सदाशिवरावभाऊंनीं दिल्लीच्या सिंहासनावरील चांदीचें छत वितळवून रुपये पाडिले आणि महादजी शिंदे यांनीं निःसहाय बनलेल्या दिल्लीच्या बादशहाला दिल्लीस आणून बसविलें व सर्व हिंदुस्थानवर बादशहाचे वकील-इ-मुतालक म्हणून सार्वभौम सत्ता गाजवावी अशी सनद मिळविली. तथापि या सर्व गोष्टी त्यांनीं मोगल बादशहाचे नोकर या नात्यानेंच केल्या हें आपण विसरतां कामा नये. या गोष्टी घडे-पर्यंत इ. स. १७९० साल उजाडावें लागलें आणि त्यानंतर दहाबारा वर्षांच्या आंतच हें सार्वभौमत्व ब्रिटिशांच्या हातीं गेलें. १८०३ सालीं पुण्याचे पेशवे ब्रिटिशांच्या तैनाती फौजेच्या साहाय्यानें पुण्यांत राज्य करूं लागले. आणि दिल्लीचा बादशहाहि ब्रिटिशांनींच आपल्या छत्राखालीं घेतला! आधुनिक युगांत स्वातंत्र्यानें व सन्मानानें नांदावयाचें असेल तर मध्ययुगीन संस्कृति सोडून आधुनिक संस्कृतीचाच स्वीकार केला पाहिजे, असा या घडामोडीचा खरा अर्थ होता.

१

## तेव्हांचें जग आणि आजचें जग

इ. स. १८१८ सालचें जग आणि आजचें जग यांची जर आपण तुलना करूं लागलों, तर आपणांस काय दिसेल? १७९० च्या सुमारास महादजी शिंदे आणि नाना फडणीस हे 'दिल्लीचा बादशहा आपल्या ताब्यांत आला, आतां त्याच्या नांवानें आपणांस अटकेपासून रामेश्वरापर्यंत आणि सिंधपासून बंगाल-पर्यंत जे जे राज्यकर्ते होते, त्या सर्वांवर आपली सत्ता गाजवितां येईल' अशीं मनोराज्यें रचीत होते. पण ब्रिटिश व फ्रेंच मुत्सद्दी यावेळीं निराळ्याच विचारांचें चिंतन करण्यांत गर्क झाले होते. फ्रेंच राज्यक्रांति नुकतीच झाली होती आणि त्या राज्य-क्रांतींतून निर्माण झालेली प्रचंड शक्ति नेपोलियनच्या रूपानें सर्व युरोपांतील सरंजामशाही राज्यें पादाक्रांत करून स्पेन-पोर्तुगालपासून रशिया-ईजिप्तपर्यंतचा युरोपखंड हादरून सोडीत होती. नेपोलियनचें राज-कारण टिपू सुलतानपर्यंत येऊन पोहोचलें असून महादजी शिंदे व नाना फडणीस यांना ब्रिटिशांना हिंदुस्थानांतून हाकलून द्यावयाचें झाल्यास फ्रेंचांचें दास्य पत्करावें लागणार आहे, हें नेपोलियन जाणून

होता. ब्रिटिशांना माहित होतें कीं युरोपांत नेपोलियनचा पाडाव करणें व हिंदुस्थानांत मराठ्यांचा पाडाव करणें या गोष्टी परस्परावलंबी असून या लढ्यांत जो विजयी होईल त्याला सर्व जगावर शेंदोनशें वर्षे निष्कंटक सार्वभौमत्व गाजवितां येईल. केवळ हिंदुस्थानच काय सर्व आशिया, आफ्रिका व अमेरिका हीं तीनहि खंडें यावेळीं युरोपच्या परसांतील भाजीच बनूं लागली होती. त्यावेळच्या जगाची वास्तविक स्थिति अशी होती. पण ह्या वास्तव जगाची आम्हांस कल्पना नव्हती. हिंदुस्थानांत हिंदुपदपातशाही स्थापन होणार कीं, मुसलमान पातशाही पुनरुज्जीवित होणार या काल्पनिक प्रश्नांचें चिंतन करण्यांत आम्ही निमग्न होतों. आमचे त्यावेळचे सर्व व्यवहार स्वप्नांत चालणाऱ्या झोंपाळू मनुष्यासारखेच त्यावेळीं घडत होते असें आतां वाटतें. आमची विचारसृष्टि आणि त्यावेळची वास्तवसृष्टि यांचा कांहीं मेळच उरला नव्हता. आमचे विचार जगाच्या विचारांमागें निदान दोन शतकें तरी त्यावेळीं होते. इ. स. १८०० मधील आमच्या विचारांचें स्वरूप इ. स. १६०० पूर्वीच्या युरोपियनांच्या विचारांसारखें होतें.

## दोन संस्कृतींची वाढती झुंज

आतां त्यावेळच्या जगाचा विचार बाजूस ठेवून आजच्या जगाचा विचार करूं या. १८१८ सालीं मराठ्यांचा आणि त्याच सुमारास नेपोलियनचा पाडाव करून ब्रिटिश साम्राज्य शंभर वर्षे सर्व जगभर आपल्या पूर्ण प्रतापानें आणि पूर्ण वैभवानें गाजलें. १९१४ पासून या साम्राज्याचा प्रचंड कोट ढासळण्यास सुरवात झाली, असें म्हणण्यास हरकत नाहीं. ब्रिटनमध्यें उदय पावून सर्व जगभर फैलावलेली भांडवलशाही संस्कृति आज मरूं लागली आहे. युरोपांतील सरंजामदार व भांडवलदार यांच्यांतील वर्गकलहाच्या रुपानें या संस्कृतीचा उदय झाला, असें म्हणा किंवा या संस्कृतीच्या आश्रयानें युरोपीय भांडवलदार वर्गानें सरंजामदारांचा पाडाव करून आपलें प्रभुत्व सर्व जगभर प्रस्थापित केलें म्हणा, आधुनिक युगांत युरोपांत निर्माण झालेली संस्कृति ही आज भांडवलदारांची भांडवलशाही संस्कृति ठरली आहे. १९१४ ते १९१९ आणि १९३९ ते १९४५ अशीं दोन जागतिक महायुद्धें होऊन तीस-चाळीस वर्षांपूर्वी सर्व संस्कृतीचें व संपत्तीचें आगर मानिलें जाणारें युरोपखंड आज बेचिराख आणि उध्वस्त होऊन जमीनदोस्त झालें आहे ! सर्व जगांतील पहिल्या प्रतीचें प्रबल साम्राज्य म्हणून शंभर वर्षे वाढलेलें व गाजलेलें ब्रिटिश साम्राज्य आज तिसऱ्या प्रतीचें राष्ट्र बनलें आहे. सर्वांत मागासलें गणलेलें रशियाचें प्रचंड राष्ट्र पहिल्या प्रतीचें बलाढ्य राष्ट्र बनलें असून बर्लिनपासून पेकिंगपर्यंत व मॉस्कोपासून पामीरच्या पठारापर्यंत त्याचे हातपाय पसरलेले आहेत. आमच्या देशांत नवीन निर्माण होणारें पाकिस्तान आणि काश्मीर संस्थान यांच्या सरहद्दीला त्याची सरहद्द मिळाली असून, रशियांत निर्माण झालेली अथवा प्रथम अधिकारारूढ झालेली समाजवादी संस्कृति सर्व जगभर फैलावणार अशी आशा धरून ती सफल करण्यासाठीं आपल्या जीवितांचा होम करणारा समाजवादी संप्रदाय प्रत्येक देशांत पसरूं लागला आहे. या समाजवादी संस्कृतीची शास्त्रीय मीमांसा करणारा कार्ल मार्क्स इ. स. १८१८ सालींच जन्माला आला होता. त्यानें १८४७ सालीं कम्युनिस्ट जाहिरनामा प्रसिद्ध केला. त्यांत, भांडवलशाही संस्कृतींत निर्माण होणारा वर्गविग्रह सर्व जगांत फैलावेल आणि त्यांत सर्व जगांतील कामगार एकजूट होऊन सर्वत्र समाजवादी क्रांति यशस्वी करतील, असें भाकित केलें आहे. यानंतर सत्तर वर्षांनीं १९१७ सालीं रशियांत समाजवादी क्रांति यशस्वी झाली आणि त्यानंतर तीस वर्षांच्या आंत समाजवादी संस्कृतीनें मंडित असें प्रचंड रशियन राष्ट्र आज जगांतील पहिल्या प्रतीचें राष्ट्र बनलें आहे. त्याचा दरारा अमेरिकेलाहि वाटावा इतकें त्याचें सामर्थ्य वाढलें आहे. आजच्या जगांत अमेरिका आणि रशिया हीं दोनच खरीं बलाढ्य राष्ट्रें नांदत असून तीं राष्ट्रें अनुक्रमें भांडवलदार संस्कृति आणि समाजवादी संस्कृति यांची पुरस्कर्तीं समजलीं जातात. आतां यापुढें जर तिसरें महायुद्ध झालें, तर तें या दोन बलाढ्य राष्ट्रांच्या नेतृत्वाखालींच होणार, हें सर्वांना समजून चुकलें आहे. या महायुद्धांत जर अमेरिकेचा विजय झाला तर कांहीं काळ तरी समाजवादी संस्कृति नामशेष होईल अशी आशा अमेरिकेला वाटत असून असें

युद्ध पेटल्यास सर्व युरोपांत व आशियांत शेतकरी—कामकरी वर्ग समाजवादी क्रांतीच्या झेंड्याखालीं गोळा होईल अशी आशा जगभर पसरलेल्या कम्युनिस्टांना व रशियाला वाटत असणें साहजिक आहे. तात्पर्य, आजच्या जगांत समाजवादी संस्कृति आणि भांडवलशाही संस्कृति यांचा लढा चालू असून या लढ्यांतून आणखी एखादें महायुद्ध पेटेल आणि जगांतील सर्व राष्ट्रांत ते पसरत गेल्यास सर्वांचीच राखरांगोळी होण्याचा व सर्व राष्ट्रांत वर्गकलहात्मक क्रांत्यांचें उठाव होण्याचाहि संभव आहे. युरोप व आशिया या खंडांतील रशियाच्या कक्षेंत न येणाऱ्या देशांत आपलें भांडवल कर्जरूपानें पेरावें आणि या सावकारीच्या जोरावर या देशांवर आपलें राजकीय प्रभुत्व प्रस्थापून तेथें समाजवादी संस्कृतीनें आपलें वर्चस्व स्थापूं नये, असे प्रयत्न अमेरिकन भांडवलशाही करीत आहे.

## २

## ब्रिटनचें समाजवादी मंत्रिमंडळ

इंग्लंडांत आज समाजवादी मंत्रिमंडळ अधिकारावर असून रशिया व अमेरिका यांच्या दरम्यान शक्य तों महायुद्ध होऊं नये, निदान झालेंच तर तें जगभर पसरूं नये आणि आपण त्यांत गोविलें जाऊं नये असें त्याला मनापासून वाटत असणें साहजिक आहे. कारण अशा युद्धांत अमेरिकेचा विजय झाला व भांडवलशाहीला कांहीं काळ जीवदान मिळालें, तरी आपलें राष्ट्र त्यांत अमेरिकेच्या आर्थिक दास्यांतच जाणार व कदाचित् माऱ्यांत होरपळूनहि जाण्याचा धोका आहे, याची जाणीव ब्रिटनमधील आजच्या मंत्रिमंडळाला असेल. तसेंच आपण आपल्या साम्राज्याचा बचाव करूं शकत नाहीं, याचा अनुभव गेल्या महायुद्धांत त्याला आला असून आजही साम्राज्यरक्षणाचा खर्च आणि त्याला लागणारें मनुष्यबळ आपणापाशीं नाहीं, याचीहि जाणीव त्याला होऊं लागली आहे. यामुळेंच हिंदुस्थान आणि आशियाखंड यांच्यामधून आपल्या साम्राज्याचा पसारा आवरून घ्यावा, असें धोरण तें आंखीत आहे. त्या मंत्रिमंडळाचें धोरण व एकंदर दृष्टिकोण समाजवादी असल्यानें भांडवलशाही संस्कृति आपल्या आंतरविरोधांनीं कोलमडून पडणार असून तिला चिरंजीव करण्याचा अमेरिकेचा प्रयत्न फोल ठरणार आहे, अशीहि ब्रिटनमधील समाजवादी पुढाऱ्यांची खात्री झाली असली पाहिजे. यामुळें अमेरिकेचा साम्राज्यवादी अहंकार आणि भांडवलशाही संस्कृति चिरंतन करण्याची तिची आकांक्षा ब्रिटिशांच्या आजच्या मंत्रिमंडळाला समंजस वाटण्याचा फारसा संभव नाहीं. जगाच्या अशा अवस्थेंत आज हिंदुस्थान स्वतंत्र होत असून त्यांत हिंदी संघराज्य व पाकिस्तान अशीं दोन स्वतंत्र सार्वभौम राज्यें अस्तित्वांत येत आहेत. तेव्हां आजच्या जगाकडे पाहण्याची नवभारताची दृष्टि कोणती आहे व कोणती असावी ?

## ३

## आजचें भारतीय नेतृत्व व त्याचें महत्त्व

पाकिस्तानचा विचार क्षणभर बाजूस ठेवून हिंदी संघराज्याचाच विचार आपण करूं लागलों, तर आपणांस काय दिसतें ? हिंदी संघराज्याचें क्षेत्रफळ व लोकसंख्या यांचा विचार केल्यास जगांतील कोणत्याहि राष्ट्रापेक्षां हें मोठें ठरेल. अर्थात् केवळ क्षेत्रफळाच्या दृष्टीनें रशियाची बरोबरी कोणीच करूं शकणार नाहीं. पण रशियाची लोकसंख्या हिंदी संघराज्याहून कमी आहे व चीनची एकंदर लोकसंख्या अधिक असली तरी त्यांत आज जीं दोन राज्यें नांदत आहेत, त्यांच्यापैकीं कोणत्याहि एका राज्यापेक्षां हिंदी संघराज्याची लोकसंख्या अधिक आहे. या राज्याचीं सूत्रें आज एकाच प्रचंड राष्ट्रसभापक्षाच्या हातीं एकवटलीं असून या पक्षांत म. गांधी व पं. जवाहरलाल नेहरू हे दोन प्रभावी नेते आहेत. हे दोघेहि समाजवादी संस्कृतीला अनुकूल असून राष्ट्रसभा शेतकरी—कामकरी राज्य स्थापन करण्याच्या ध्येयाला अधिकृतपणें वचनबद्ध झालेली आहे. या ध्येयाचा अर्थ मार्क्सवादी दृष्टीनें लावणारा पण लोकशाही समाजवादाचा व शांततामार्गानेंच हें ध्येय गांठण्याचा प्रयत्न करणारा एक पोटपक्ष या संस्थेंत गेलीं दहा बारा वर्षें एकसारखा वाढत आला असून देशांतील तरुण वर्गावर त्याची छाप पडली आहे. यामुळें ही राष्ट्रसभा जुन्यानव्या पुढाऱ्यांतील मतभेद विकोपास जाऊन

[ पान ७६ पहा

# माझ्या क्रियात्मक जीवनाचें तात्त्विक अधिष्ठान

सेनापति पांडुरंग महादेव बापट

[ मी लेखक नाहीं. लेखक याचा अर्थ ज्याची लेखणी एका किंवा अनेक विषयांवर थोड्याशा बाह्य प्रेरणेनें किंवा स्वयंप्रेरणेनें, कोणत्याहि परिस्थितींत, अव्याहत चालूं शकते तो. मी जें कांहीं थोडेंसें आजवर लिहिलें, तें आंतून जोराची प्रेरणा झाली तेव्हां लिहिलें किंवा बाहेरून कोणा स्नेही माणसाच्या अत्याग्रहास्तव लिहिलें. ]

मनुष्याच्या बाह्य हालचालीं-मागें, स्पष्ट वा अस्पष्ट प्रकट वा अप्रकट मानसिक हालचाल असते. अगदीं पहिल्या श्वासोच्छ्वासामागें देखील मनाचा व्यापार असतो, असें मी मानतों.

मनुष्याचें मन प्रौढ होऊन तो आत्मनिरीक्षण करूं लागला म्हणजे, त्याला त्याच्या बाह्य व आंतरिक व्यापारांत कांहीं व्यवस्था व कांहीं अव्यवस्था दिसते; व त्यांत सुव्यवस्था करून आपलें अंतर्बाह्य जीवन स्वतःला संतोषप्रदायक करण्याची त्याला स्फूर्ति होते.

## जीवनांत क्रांति

मला अशी स्फूर्ति वयाच्या बाविसाव्या वर्षा-पर्यंत झाली नाहीं. १९०२ सालीं कांहीं सन्मित्रांच्या प्रेरणेनें मी आत्मनिरीक्षण करावयास आरंभ केला. या आत्मनिरीक्षणाच्या काळांत एका सायंकाळीं,

निशा माझी दिन—करीं द्यावया ठाकला कुणी
संध्याशील संधिकाल साधु संध्यर्थ साधुनी ॥

या सुयोगानें माझ्या मनांत कांहीं सुव्यवस्था मला करतां आली. त्या सायंकाळीं त्या संध्याशील सज्जनासमोर मी माझी अल्पस्वल्प शक्ति देश-स्वातंत्र्यार्थ खर्च करीन अशी प्रतिज्ञा केली. याप्रतिज्ञा-विधीनें माझ्या अंतर्बाह्य जीवनांत क्रान्ति झाली. यासंबंधानें मी असें लिहिलेलें आहे—

विधी तो नव्हता झाला गृहसेवा तदा मम
चित्तासि वाटे परम इष्ट गोष्ट दुज्यासम ॥
" त्या सेवेची परमता विश्वसेवेपुढें नसे
" तिन्हें साधन सर्वत्र देशस्वातंत्र्य हें असें" ॥
**माझीनीची** आणि माझी नीति यापरि तो विधि
करी एक; निशा माझी गेली दिनकरीं तधीं ॥

देशाचें स्वातंत्र्य याचा तेव्हांचा अर्थ इंग्रज जाऊन देशांतील राजकीय सत्ता देशी लोकांच्या हातांत येणें असा होता.

याप्रमाणें १९०२ सालीं माझ्या मनांतील संसाराला एक महत्त्वाचें व्यवस्थातत्त्व मिळालें. मी एक स्वातंत्र्य-सैनिक आहे. माझ्या नायकाची हांक येईल तेव्हां क्षणाचाहि विलंब न करतां, सर्वस्व अर्पण करण्याच्या तयारीनें, नेमून दिलें जाईल तें कार्य करणें आहे, हा विचार माझ्या इतर विचारां-वर व अर्थात् आचारावर नियंत्रण करूं लागला.

## युनिव्हर्सिटी स्कालर्शिप बंद

१९०४ सालीं, मुंबईच्या आर्यन एज्युकेशन सोसायटीच्या हायस्कूलमध्यें थोडा काळ मी होतों. त्या काळांत तेथील सहाव्या, सातव्या इयत्तेच्या मुलांपैकीं कांहींजणांना घरीं बोलावून मी त्यांच्या जवळ स्वातंत्र्यसेवेच्या गोष्टी करीत असे. कांहींनीं स्वातंत्र्यसेवेची शपथहि मजजवळ घेतली. त्यावर्षी जुलै महिन्यांत, योगायोगानें मी इंग्लंडला गेलों. तेथें



अणुक्रमणिका

एडिंबरोला रहावयाचें ठरवून एंजिनिअरिंग शिकूं लागल्यावर, कांहीं दिवसांनीं युनिव्हर्सिटीच्या व्हॉलंटिअर कंपनीमध्यें मी आपलें नांव दाखल करून घेतलें. पुढें एका समाजवादी गृहस्थाची ओळख झाल्यानंतर, त्यानें मला आग्रह केला कीं, मी तेथील इंडिपेंडंट लेबर पार्टीच्या शाखेच्या विद्यमानें एक व्याख्यान हिंदुस्थानच्या स्थितीवर द्यावें. त्याच्या आग्रहास्तव थोडा अभ्यास करून मी एक व्याख्यान दिलें. स्वातंत्र्यसेवेचा एक लहानसा भाग म्हणून तें व्याख्यान मी छापून घेऊन हिंदुस्थानांत पाठविलें असतां, त्याची दखल मुंबई युनिव्हर्सिटीच्या सेनेटनें घेतली; व मला रेजिस्ट्रारचें पत्र आलें कीं, तुम्ही मंगळदास नथुभाई टेक्निकल स्कॉलर असतां असें व्याख्यान कसें दिलें याचा जबाब द्यावा. व्याख्यान लिहून काढीत असतां मला हें स्पष्ट दिसत होतें कीं, हें व्याख्यान देणें म्हणजे स्कॉलरशिपवर पाणी सोडणें आहे, व प्रसंगीं स्कॉलर्शिपवर पाणी सोडण्याचें ठरवूनच मी लेखणी चालविली होती.

माझ्या क्रियात्मक जीवनाला जें नियंत्रक व प्रेरक तत्त्व प्रतिज्ञाविधीच्या दिवशीं मिळालें होतें त्याचा आंतून आग्रह व माझ्या समाजवादी स्कॉट मित्राचा बाहेरून आग्रह, अशा परिस्थितींत मी जें केलें तेंच योग्य होतें. युनिव्हर्सिटी रेजिस्ट्रारच्या पत्राला मी बरेंच विस्तृत उत्तर लिहून माझ्या व्याख्यानाचें समर्थन केलें. अर्थात् या उत्तरावर स्कॉलर्शिप बंद केल्याचें उत्तर मला आलें.

## स्वातंत्र्यवीरांचें दर्शन

मी लंडनला श्री. श्यामजी कृष्णवर्माच्या इंडियाहाऊसमध्यें गेलों. तेथें स्वातंत्र्यवीर सावरकर यांचें दर्शन प्रथम घडलें. त्यांच्या सहवासांत १९०६ सप्टेंबर ते १९०७ जूनपर्यंत मी होतों. या मुदतींत मीं दोन निबंध लिहिले. "आमच्या कॉंग्रेसनें काय करावयास हवें?" या निबंधाच्या प्रती कलकत्ता कॉंग्रेसच्या कँपांत पाठविल्या. त्यानंतर "२००७ चें हिंदुस्थान" हा निबंध एडिंबरोच्या एका वाङ्मयसभेपुढें वाचला. त्यावेळीं सभेंतील श्रोत्यांना उत्तरें देण्याच्या प्रसंगानें माझें रिव्हाल्व्हर मी टेबलावर काढून ठेवलें; व श्रोत्यांना—आमच्यावर राज्य करणारांना—सांगितलें कीं, हिंदुस्थानांतील स्वातंत्र्येच्छु लोक सर्व—मिळूं शकतील तीं सर्व—शस्त्रास्त्रें उपयोगांत आणून तुमच्या मगरमिठींतून आपला देश सोडवितील. लाला लजपतराय यांच्या हद्दपारीची बातमी आल्यानंतर, मी लंडन सोडून पॅरीसला थोडीशी बाँबविद्या शिकावयास गेलों. १९०८ च्या मार्च अखेर मी हिंदुस्थानांत परत येऊन लवकरच कलकत्त्यास गेलों. तेथें मित्राच्या घरीं बाँब तयार केले जात होते. त्या कामांत किंचित् सहकार केला. कलकत्त्यास गेल्याच्या दुसऱ्या दिवशींच ताप आल्यानें परतलों तों घरीं दोन महिने अंथरुणावर होतों. या दोन महिन्यांत पाहिले बाँब उडून गेले होते. माझ्या किंचित् सहकाराची माहिती सरकारला देणारा एकजण निघाल्यानें मी अज्ञातवास पत्करला. तो एका अज्ञातवासांत झालेल्या स्नेह्याच्या स्नेहपूर्ण कारवाईनें संपला. माझ्या स्नेह्यानें ज्या सी. आय. डी. अधिकाऱ्याच्या ताब्यांत मला दिलें, तो अधिकारी माझ्याशीं चांगल्या तऱ्हेनें वागला; व सरकारनें मला लवकरच (१९१२ जानेवारी अखेर) मोकळें केलें.

स्वातंत्र्यसेवा हें व्यवस्थातत्त्व १९०२ सालीं मला लाभलें. तेव्हांपासून त्या तत्त्वाच्या अधिष्ठानावर, माझ्या क्रियात्मक जीवनाची जी उभारणी मीं केली, तिची त्रोटक १९१२ पावेतोंची रूपरेषा वरीलप्रमाणें आहे.

## स्वातंत्र्यसेवेंतून समाजसेवा

१९१३ सालीं पारनेरीं असतांना स्वातंत्र्यसेवेच्या तत्त्वाचा मी खोल विचार केला. या विचारांतून दैनंदिन समाजसेवेचें तत्त्व मजपुढें उभें राहिलें. या तत्त्वाला वंदन करून मी आपल्या क्रियात्मक जीवनाला स्थानिक परिस्थितीनुसार विशिष्ट वळण दिलें. सकाळीं ५।६ तास झाडूकाम, भंगीकाम, दुपारीं ब्राह्मणाच्या मुलांस शिकविणें, सायंकाळीं चव्हाट्यावर ज्ञानेश्वरीवाचन, नंतर घरीं कुणबी मुलांस शिकविणें, रात्रीं महारवाड्यांत, जाऊन शिकविणें, याप्रमाणें पारनेरचा कार्यक्रम होता. या कार्यक्रमाबरोबर मनाचें मंथनहि सुरू होतें. मनांतील उत्कट विचारांचें अभंगादि सोप्या वृत्तांमधून ग्रथनहि सुरू होतें.

## सर्वगामी नियोजकाचा साक्षात्कार

माझ्या बालपणापासून १९१३ सालापर्यंत माझ्याशीं कित्येकांचा अनपेक्षितपणें संबंध आला. या संबंधामुळें कित्येक गोड गोष्टी, कित्येक कडू गोष्टी घडून आल्या. या संबंधांचा व घटनांचा बारकाईनें विचार करतां मला, माझ्या बुद्धिला **एका सर्वगामी नियोजकाचा** साक्षात्कार झाला. हा एकच अनेक होऊन त्या अनेकांचा आत्म-विकास, विविध गोड-कडू घटनांच्या द्वारां घडवीत आहे, असें मला दिसल्यानंतर मी

" मज काय मी तो सेवक हरीचा
वेडापिसा त्याचा त्यासी गोड " ॥

अशी तात्त्विक बैठक घेतली. व माझ्या झाडूकामासंबंधानें माझे वडील नाराज झाले, तेव्हां

तुम्ही पूजक देवाचे देवाचा मीहि पूजक
सर्वव्यापी देव माझा त्याची मी झाडि बैठक ॥
तुम्ही बैठक झाडीतां सान मंगल-मूर्तिची
आन कांहीं न करि मी मीहि सेवा करी तिची ॥

अशी माझी बाजू त्यांस समजावून दिली.

ही १९१३ सालीं लाभलेली तात्त्विक बैठक कायम आहे. १९१३ सालापूर्वीच्या माझ्या क्रियात्मक जीवनांत माझी वैचारिक बैठक काय होती, त्यासंबंधानें,

देवपूजक मी बाल, शिशु मी देवपूजक
पूर्वयौवनिं झालों मी मानव्य—ध्येय—पूजक
देहपूजक नास्तिक्य माझ्या न शिरलें मनीं
देवपूजक आस्तिक्य सोडिलें पूर्वयौवनीं ॥
त्या सांध्याविधिनें मोठा, ध्येय-देव दिला मला
मानव्य—सेवा—ध्येयाला मी मदात्मा समर्पिला ॥

असें मी लिहिलेलें आहे. खरी गोष्ट मला दिसते, ती अशी आहे कीं,

मूर्तिरूप ध्येयरूप अमूर्त ध्येय—आकर
त्रिरूपी ती हरी एक चिन्माया—मुरलीधर ॥

नाना मूर्तींची, नाना ध्येयांची, नाना देवांची पूजा करणारे, वस्तुतः त्या एका देवदेवाची, सर्वातीत, सर्वरूप, सर्वांतर्यामी सच्चिदानंदाचीच पूजा करीत असतात. आत्मविकासाच्या एका विशिष्ट पायरीवर आल्यावर ही गोष्ट लक्षांत येते. त्यापूर्वी ती लक्षांत येत नाहीं, एवढेंच.

१९१३ सालापासून आजवर ज्या खटपटी मी केल्या, त्यांतील मुळशी सत्याग्रहासारख्या कांहीं लोकविदित आहेत. १९०२ पासून १९१३ पर्यंतच्या माझ्या खटपटींविषयींहि असेंच म्हणावें लागतें कीं, त्यांपैकीं कांहीं थोड्या लोकविदित आहेत. सर्व सेवकांना हाच न्याय लागू आहे. कोणी लोकमान्य टिळकांसारखा, महात्मा गांधींसारखा महान् सेवक असो किंवा कोणी माझ्यासारखा क्षुद्र सेवक असो— कोणाहि सेवकाच्या सेवाविषयक खटपटी, कांहीं लोकप्रसिद्ध असतात, कांहीं लोकांना अज्ञात असतात व अज्ञात राहतात. तथापि त्या त्या सेवकाच्या क्रियात्मक सेवकजीवनाचा त्या अज्ञात खटपटी ज्ञात खटपटींइतकाच महत्त्वाचा विभाग असतात आणि त्या सर्व खटपटींना आधारभूत, मार्गदर्शक व नियंत्रक, अशी एक त्या त्या सेवकाची विशिष्ट वैचारिक किंवा तात्त्विक बैठक असते.

## ' कष्टें करा हरी तुष्ट '

स्वातंत्र्यसेवा, समाजसेवा, सच्चिदानंदसेवा किंवा ( माझ्या संवयीच्या शब्दांत ) श्रीहरिसेवा हीं तीनहि तत्त्वें माझ्या मनांत सदैव जागृत आहेत. स्वातंत्र्य-सेवा समाजसेवेंत अंतर्भूत होते. व समाजसेवा श्रीहरिसेवेंत अंतर्भूत होते. श्रीहरि हा नित्य निकट, अंतरींच्या अंतरीं, आत्म्याचा आत्मा अथवा परमात्मा

उपद्रष्टानुमन्ता च भर्ता भोक्ता महेश्वरः ।

या विविध रूपांत सदैव उपस्थित असल्यानें, त्याची सेवा सदैव करतां येते. तो उपद्रष्टा आहे, जवळून आपल्या आंतल्या व बाहेरच्या हालचाली पाहत आहे, तेव्हां या हालचाली, मनांतल्या व जनांतल्या, खाजगी आणि सार्वजनिक, त्याला संतोष देतील अशा करण्याचा प्रयत्न करणें, ही त्याची सेवा आहे. त्याचा संतोष तोच आपला संतोष; कारण तो आपल्या आत्म्याचा आत्मा आहे. हा संतोष लाभला म्हणजे परिस्थितीचे कोणतेहि धक्के आपल्याला कर्तव्यच्युत करूं शकत नाहींत. हा संतोष लाभला म्हणजे समाजांत, स्वातंत्र्यविषयक अगर इतर, समाजहिताचें कोणतेंहि स्वकर्तव्य करीत असतां, समाजाकडून आपली निंदा झाली, छळणूक

[ पान २७ पहा.



अणुक्रमणिका

# आर्यांची विवाहसंस्था

डॉ. के. ल. दप्तरी, बी. ए. बी. एल्., डी. लिट्. ( नागपूर )

कोणत्याहि समाजाच्या सातत्याला आणि सुस्थितीला चांगली आणि पुष्कळ संतति फार अवश्य आहे; आणि अशी संतति विवाहसंस्थेच्या शास्त्रशुद्ध स्वरूपावर अवलंबून आहे. म्हणून आर्यांची विवाहसंस्था प्राचीनकाळीं कशी होती, ह्या प्रश्नाचा विचार करण्याचें प्रस्तुत लेखांत योजिलें आहे.

## सुप्रजाजनन हें उद्दिष्ट

एकाच आईबापापासून उत्पन्न झालेल्या मुलांमध्यें जर विवाह चालू ठेवले तर जी संतति होते, त्या संततीमध्यें आईबापाचे चांगले गुण जसे वृद्धिंगत होतात, तसेच वाईट गुणहि वृद्धिंगत होतात. केव्हां केव्हां असेंहि पण घडतें कीं, आईबापांत अव्यक्त स्थितींत असलेले वाईट गुण त्यांच्या संततीमध्यें प्रगट होतात. म्हणून एकाच आईबापाच्या संतानांमध्यें विवाह होणें ही गोष्ट चांगलीहि आहे आणि वाईटहि आहे. म्हणून आजच्या सुप्रजाजननशास्त्रापुढें, अशी वाईट संतति होण्याचें कसें टाळावयाचें,हाच मोठा प्रश्न आहे. हा प्रश्न केवळ मनुष्यनियंत्रित जनावरासंबंधानें सोडवावयाचा असल्यास फारच सोपा आहे. आणि तो प्रश्न अशा रीतीनें सोडवितां येतो कीं, वाईट गुण प्रगट करणाऱ्या व्यक्तींना संतति निर्माण करूं देऊं नये. परंतु जेव्हां मनुष्य–समाजास ह्या प्रश्नाचें उत्तर लागूं करावयाचें असतें, तेव्हां अनेक अडचणी उत्पन्न होतात. कारण जनावरांचें जसें नियंत्रण करतां येतें, तसें मनुष्यांचें नियंत्रण करतां येणें कठीण आहे. म्हणून हा प्रश्न प्राचीन आर्य लोकांनीं कसा सोडविला, हें जाणून घेण्याविषयीं फार कुतूहल वाटतें.

परंतु दुर्दैवाची गोष्ट अशी आहे कीं, ह्यासंबंधीं माहिती मिळण्याचीं साधनें फार थोडीं आहेत. वायुपुराण किंवा ब्रह्मांडपुराण ह्यांत आर्यांचा प्राचीन इतिहास सांठवलेला आहे, हें आम्ही इतरत्र दाखविलें आहे. परंतु त्यांतहि ' आनंद ' नांवाच्या ब्रह्म्यानें श्वेतवाराहकल्पाच्या आरंभीं, ( म्हणजे इ. स. पूर्वी ३१०२ यावर्षीं ) विवाहसंस्था स्थापन केली ह्यापेक्षां जास्त माहिती मिळत नाहीं. म्हणून आर्यांच्या विवाहसंस्थेविषयीं आपणांस जेथून जेथून मिळवितां येईल, तेथून तेथून माहिती मिळविणें भाग आहे.

## विवाहविषयक कांहीं वैदिक वचनें

ऋग्वेदामध्यें विवाहासंबंधीं एक कायदा पुढील ऋचेंत सांगितला आहे:

> आयाहींद्र पथिभिरीळितेभि-
> र्यज्ञमिमं नो भागधेयं जुषस्व
> तृप्तां जहुर्मातुलस्येव योषा
> भागस्ते पैतृष्वसेयी वपामिव ।।

ह्याचें भाषांतर पुढीलप्रमाणें केलें आहे. " हे इंद्रा, चांगल्या रस्त्यांनीं तूं आमच्या ह्या यज्ञाकडे ये, आणि आपला हिस्सा घे. त्यांनीं तुपानें मिश्रित केलेली अशी चरबी तुझ्याकरतां निराळी काढून ठेविली आहे. तुझा तीवर हक्क आहे. जसा आतेच्या मुलीवर किंवा मामाच्या मुलीवर मनुष्याचा हक्क असतो, तसा तुझा त्या चरबीवर ( वपेवर ) हक्क आहे "

१ याच लेखकाचा प्रसिद्ध होणारा ग्रंथ–" Social Institutions of Ancient India " ( नागपूर युनिव्हर्सिटींत दिलेलीं व्याख्यानें. )

ह्यावरून अत्यंत प्राचीन काळीं मनुष्य आपल्या आतेच्या मुलीशीं किंवा मामाच्या मुलीशीं हक्कानें विवाह करूं शकत असे. महाभारतांत असें सांगितलें आहे कीं अर्जुनाचा विवाह त्याच्या मामाची मुलगी सुभद्रा हिच्याशीं झाला होता ( आदिपर्व, अध्याय २१९, २२० ). हरिवंशांतहि असें सांगितलें आहे कीं, कृष्ण आणि रुक्मिणी ह्यांचा मुलगा प्रद्युम्न याचा विवाह त्याच्या मामाच्या म्हणजे रुक्मिणीच्या मुलीशीं झाला होता आणि त्या विवाहापासून झालेल्या अनिरुद्धाचा विवाहहि रुक्मीच्या नातीशीं झाला होता ( विष्णुपर्व, अध्याय ६१ ). मामाच्या मुलीशीं लग्न करण्याची चाल अद्यापिहि दक्षिण हिंदुस्थानांतील आर्यांत चालू आहे आणि त्यांनीं ती चाल उत्तर हिंदुस्थानांतूनच, असे विवाह उत्तर हिंदुस्थानांत बंद होण्यापूर्वी, नेली असावी हें उघड आहे. शतपथ ब्राम्हणांतील पुढील वचनांतहि फार प्राचीन काळीं असे विवाह चालू होते ह्या गोष्टीस पुष्टि मिळते. तें वचन असें :

तद्वा एतत् । समान एव कर्मन् व्याक्रियते ।
तस्माद् समानादेव पुरुषादत्ता चाद्यश्च जायेते ।
इदं हि चतुर्थे पुरुषे तृतीये संगच्छावह इति विदेवं
दीव्यमाना जात्या आसत एतस्माद् तत् ॥ ६ ॥

शतपथ ब्राह्मण. १-८-३-६

अर्थः—तें हें असें आहे. समानांच्या ठिकाणींच सत्कर्मांचा उत्कर्ष होतो. म्हणून उपभोग घेणारा ( पति ) आणि उपभोगिली जाणारी स्त्री दोन्ही एकाच पुरुषापासून उत्पन्न होतात. ह्या कारणामुळेंच आपणांस चवथ्या पिढींत ( मध्यें पुरुषच असले तर ) किंवा तिसऱ्या पिढींत ( मध्यें स्त्रियाच असल्या तर ) विवाह करता येतात. असें जाणून बांधव एकमेकांशीं आनंदानें खेळत असतात.

ह्या सर्व पुराव्यावरून आपणांस अशीं अनुमानें करतां येतात :

## कोणत्या नातलगांत विवाह शक्य ?

फार प्राचीन काळीं :

( १ ) भाऊ आपल्या बहिणीशीं लग्न करूं शकत नसे. ( २ ) कोणताहि मनुष्य आपल्या चुलत बहिणीशीं लग्न करूं शकत नसे. ( ३ ) कोणताहि मनुष्य आपल्या चुलत चुलत बहिणीशीं लग्न करूं शकत असे. ( ४ ) कोणताहि मनुष्य आपल्या मामाच्या, आतेच्या किंवा मावशीच्या मुलीशीं आणि अर्थात् त्यापेक्षां दूरच्या नात्याच्या मुलीशीं विवाह करूं शकत असे. हें पुढें खालीं दिलेल्या वंशवृक्षास शतपथ ब्राम्हणांतील नियम लावल्यानें सिद्ध होतें, असें दिसून येतें.






अणुक्रमणिका




हा विवाह तिसरा पुरुष व तिसरी स्त्री ह्यामध्यें होऊं शकतो म्हणजे आतेच्या मुलीशीं.




म्हणजे हा विवाह मामाच्या मुलीशीं होऊं शकतो.




म्हणजे हा विवाह मावशीच्या मुलीशीं होऊं शकतो.

### चालीमागील उपपत्ति

पतिपत्नींमध्यें साम्य साधण्याकरतां चवथ्या किंवा तिसऱ्या पिढीच्या नातलगांमध्यें जर विवाहाची परवानगी होती, तर ज्यांच्यामध्यें साम्य अधिक संभवतें, अशा दुसऱ्या पिढीच्या सर्व नातलगांत आणि तिसऱ्या पिढीच्या कांहीं नातलगांत विवाह करण्यास प्रतिबंध कां होता, हा प्रश्न येथें उद्भवतो. त्याचें पुढील उत्तर सुचतें. हे जे जवळचे नातलग आहेत, ते बहुधा एकाच कुटुंबांत एकाच घरांत राहतात आणि त्यांना जर विवाह करण्याची परवानगी असली तर त्यांच्यामध्यें अकालीं प्रेम उत्पन्न होऊन मनुष्याची वाढ पूर्ण होईपर्यंत जरूर असलेल्या ब्रह्मचर्याचा विघात होईल, ह्या भीतीनें हा प्रतिबंध केला असावा. चवथी पिढी उत्पन्न होण्यापूर्वींच बहुधा कुटुंबें विभक्त होतात. त्यामुळें चवथ्या पिढीच्या संततीस एकाच घरांत राहण्याचा प्रसंग बहुधा येत नाहीं. म्हणून चवथ्या पिढीच्या स्त्रीपुरुषांस विवाह करण्याची परवानगी ठेविली असावी. मध्यें स्त्री असल्यास तिसऱ्या पिढीलाहि हें लागूं पडतें. शतपथ ब्राह्मणांतील नियमांची ही उपपत्ति दिसते.

### गुणसाम्यावर कटाक्ष

वर ज्या नातलगांना विवाह करण्याची परवानगी होती, त्यांचें वर्णन केलें आहे. पुढच्या काळांत ज्यांच्या विवाहाला प्रतिबंध होता, अशा नातलगांची संख्या वाढली. हें श्री. एस. व्ही. करंदीकर ह्यांच्या Hindu Exogamy ह्या ग्रंथांत (पा. १०० ते १०१) चांगलें सिद्ध केलें आहे. त्याची मी येथें पुनरावृत्ति करीत नाहीं. आपणांपुढें प्रश्न आतां हा आहे कीं, इतक्या पुष्कळ नातलगांस विवाहाची मनाई केली असतां, शतपथ ब्राह्मणांत अवश्य म्हणून सांगितलेलें साम्य पुरातनकाळीं कसें साधलें जात असे? मनुष्यानें आपल्याशीं समान असेल अशाच स्त्रीशीं विवाह करावा असा जो नियम घातला होता, त्या नियमानेंच तें साधलें जात होतें. पुढील वचनावरून हें दिसून येईल. गौतम म्हणतो,

गृहस्थः सदृशीं भार्यां विन्देतानन्यपूर्वां यवीयसीम् ॥ १ ॥ (गौतमधर्मसूत्र अ. ४·१)

आणि वसिष्ठाचें असें वचन आहे कीं,

गृहस्थः असृष्टमैथुनां यवीयसीं सदृशीं भार्याम् विंदेत ॥ १ ॥ (वसिष्ठधर्मसूत्र अ. ८–१)



अणुक्रमणिका

येथें सवर्ण हा शब्द योजिला नसून सदृशीं हा शब्द योजिला आहे. ह्यावरून असें दिसतें कीं, मनुष्यानें आपल्या गुणाशीं समान असे गुण जिच्यांत असतील, अर्थात् चांगले गुण जिच्यांत असतील, अशा स्त्रीशीं विवाह करावा. हाच आर्य विवाहसंस्थेतील विशेष होय. जरी मनुष्याला भिन्न वर्गांतील स्त्रीशीं विवाह करण्याची परवानगी होती, तरी ती स्त्री निवडतांना, त्यानें गुणसाम्याचा विचार करणें अवश्य होतें. आणि स्वतःच्या वर्णांतील स्त्रीशीं विवाह करतांना देखील, जिच्यामध्यें हें गुणसाम्य नसेल, अशी स्त्री वगळणें त्याला भाग होतें. ह्यामुळें पतिपत्नींमध्यें साम्य साधून संततीमध्यें आईबापांतील गुणांचा उत्कर्ष होत असे.

## महाभारतकालीं विवाहसंस्थेचें स्वरूप

वर प्राचीन काळीं आर्यविवाहसंस्थेचा जो विशेष होता, तो वर्णिला आहे. एवढ्यानें आपलें समाधान होत नाहीं. प्राचीन काळीं गोत्र आणि प्रवर ह्यांचे निर्बंध उत्पन्न होण्यापूर्वीं विवाहसंस्थेचें संपूर्ण स्वरूप कसें होतें, हें जाणण्याची जिज्ञासा राहतेच. विवाहसंस्थेचें असें संपूर्ण स्वरूप महाभारतांतील पुढील उताऱ्यांत दिसून येतें-तो उतारा* असा.

युधिष्ठिर उवाच

यन्मूलं सर्वधर्माणां प्रजनस्य गृहस्यच ।
पितृदेवातिथीनां च तन्मे ब्रूहि पितामह ॥ १ ॥

भीष्म उवाच

अयं हि सर्वधर्माणां धर्मश्चिन्त्यतमो मतः ।
कीदृशाय प्रदेया स्यात् कन्येति वसुधाधिप ॥ २ ॥
शीलवृत्ते समाज्ञाय विद्यां योनिंच कर्म च ।
अद्भिरेव प्रदातव्या कन्या गुणवते भवेत् ॥ ३ ॥
ब्राह्मणानां सतामेष धर्मो नित्यो युधिष्ठिर ॥ ३ ॥
आर्षेण चावहेदेवं यो दद्यादनुकूलिने ।
शिष्टानां क्षत्रियाणां च धर्म एष सनातनः ॥ ४ ॥
अप्यभिप्रेतमुत्सृज्य कन्याभिप्रेत एव सः ।
अभिप्रेता च या यस्य तस्मै देया युधिष्ठिर ॥५॥
गांधर्वमिति ते धर्मं आहुर्धर्मविदो जनाः ॥ ६ ॥
धनेन बहुधा क्रीत्वा संप्रलोभ्य च बांधवान् ।
असुराणां नृपाणां वै धर्ममाहुर्मनीषिणः ॥ ७ ॥
हत्वा छित्त्वा च शीर्षाणि रुदतीं[१०] सुदतीं गृहात् ॥
प्रसह्यहरणं तात राक्षसं[११] धर्मलक्षणम् ॥ ८ ॥
सुप्तां मत्तां प्रमत्तां वा रहो यत्रो[१२]पगच्छति ॥
स पापिष्ठो विवाहानां पैशाचः कथितोऽधमः ॥९॥
पंचानां तु त्रयो धर्म्या द्वावधर्म्यौ युधिष्ठिर ।
पैशाचश्चासुरश्चैव न कर्तव्यौ कथंचन ॥ १० ॥
ब्राह्मः क्षात्रोऽथ गांधर्व एते धर्म्या नरर्षभ ।
पृथग्वा यदि वा मिश्राः कर्तव्या नात्र संशयः॥११॥
तिस्रो भार्या ब्राम्हणस्य द्वे भार्ये क्षत्रियस्य तु ।
वैश्यः स्वजात्यां विंदेत तास्वपत्यं [१३]हितायते ॥१२॥
द्विजस्य ब्राम्हणी श्रेष्ठा क्षत्रिया क्षत्रियस्य तु ।
रत्यर्थमपि शूद्रा स्यात् नेत्याहुरपरे जनाः ॥१३॥
अपत्यजन्म शूद्रायां न प्रशंसंति साधवः ।
शूद्रायां जनयन् विप्रः प्रायश्चित्तमवाप्नुयात् ॥१४॥
नातिबालां वहंत्यन्ये अनित्यत्वात् प्रजार्थिनः ।
वहंति कर्मिणस्तस्यामंतःशुद्धिव्यपेक्षया ॥१५॥
अपरान्वयसंभूतां दुःस्वप्नादिविवर्जिताम् ।
कामो यस्यां निषिद्धश्च केचिदिच्छन्ति चापदि ॥१६॥
त्रिंशद्वर्षो दशवर्षां यो[१७] विंदेत न नग्निकाम् ।
एकविंशतिवर्षो वा सप्तवर्षामवाप्नुयात् ॥ १७ ॥

---

* या उताऱ्यांतील पाठ पी. पी. एस. शास्त्री B. A. (Oxon) M. A. ह्यांनीं प्रसिद्ध केलेल्या महाभारताच्या Southern Recension नांवाच्या प्रतींत जसा सांपडला, तसा दिला आहे. नीलकंठानें ज्यावर टीका केली आहे त्या महाभारताच्या मुंबई प्रतींत जे पाठभेद सांपडले, ते पुढें आंकडे घालून तळटीपांतून दिले आहेत.

( १ ) स्वजनस्य. ( २ ) कीदृशस्य ( ३ ) वरे ( ४ ) ब्राम्हो धर्मो ( ५ ) आवाह्यमावहेदेवं यो दद्यादनुकूलतः ( ६ ) आत्माभिप्रेतं ( ७ ) यः ( ८ ) प्राहुर्वेदविदो ( ९ ) नृपे तं वै ( १० ) रुदतां रुदतीं ( ११ ) राक्षसो विधिरुच्यते (१२) रात्रौ च. (१३) समं भवेत् (१४) प्रायश्चित्ती विधीयते (१५) १५ व १६-हे दोन श्लोक नीलकंठाची टीका असलेल्या मुंबई प्रतींत सांपडत नाहींत. ( १६ ) ' दशवर्षां ' ऐवजीं 'षोडशाब्दां' हा पाठ प्रस्तुत लेखकानें स्वीकारला आहे. याबद्दलची चर्चा या उताऱ्याच्या शेवटीं दिलेल्या तळटीपेंत पहावी. ( १७ ) भार्यां विंदेत नग्निकाम्.



अणुक्रमणिका

यस्यास्तु न भवेद्भ्राता पिता माता च भारत।
नोपगच्छेत तां जातु पुत्रिकाधर्मिकी हि सा ॥१८॥
त्रीणि वर्षाण्युदीक्षेत कन्या ऋतुमती सती।
चतुर्थेत्वथ संप्राप्ते स्वयं भर्तारमार्जयेत्[२१] ॥१९॥
प्रजा न हीयते तस्या रतिश्च भरतर्षभ।
अतोऽन्यथा वर्तमाना भवेद्वाच्या प्रजापतेः ॥२०॥
असपिंडाच या मातुरसगोत्रा + च या पितुः।
इत्येतामुपयच्छेत तं धर्मं मनुरब्रवीत् ॥२१॥ ※
महाभारत, अनुशासन पर्व अ. ४४ मद्रासप्रत.

**अर्थ**—युधिष्ठिर म्हणाला, "हे पितामह, सर्व धर्मांचें, संततीचें, कुटुंबाचें, पितृपूजनाचें, देवपूजनाचें आणि अतिथिपूजनाचें जें मूळ आहे, तें तुम्ही मला सांगा." भीष्म म्हणाले, "मुलगी कशा तऱ्हेच्या वराला द्यावी, ह्या विषयींचा धर्म सर्व धर्मांमध्यें अतिशय जास्त विचार करण्याला योग्य असा धर्म आहे.॥ २ ॥ मनुष्याचे चांगले गुण म्हणजे त्याचें शील, त्याचा धंदा, त्याची विद्वत्ता, त्याचा वंश आणि त्याचीं कर्में ह्यांची माहिती करून घेऊन तो गुणवान् आहे

(१८) वा भरतर्षभ (१९) नोपयच्छेत (२०) –धर्मिणी. (२१) अर्जयेत् (२२) अनुगच्छेत.

+ 'असगोत्रा' या पाठाबद्दल 'असपिंडा' हा पाठ असावा; याबद्दलची चर्चा उताऱ्याच्या शेवटीं दिलेल्या तळटीपेंत बघावी.

※ नीलकंठाच्या प्रतींत नववा श्लोक सांपडत नाहीं. पण १० व्या श्लोकांवरून असें स्पष्ट दिसतें कीं, ९ वा श्लोकहि नीलकंठाच्या प्रतींत असलाच पाहिजे. १५ व १६ वा हे श्लोक नीलकंठाच्या प्रतींत सांपडत नाहींत परंतु ते मुळांत असले पाहिजेत हें उघड आहे. कारण त्यांना प्रक्षिप्त करण्याचा कांहीं हेतु संभवत नाहीं. परंतु त्यांना काढून टाकण्याचा मात्र हेतु संभवतो. १० वा श्लोक सांप्रतच्या मनुस्मृतींत सापडतो. परंतु मनुस्मृतीच्या कर्त्यानें तो महाभारतांतून घेतला हें स्पष्ट आहे. कारण मनुस्मृतींतच आठ प्रकारचे विवाह सांगितले असल्यामुळें "पंचानाम् तु त्रयो धर्म्या;" हें वाक्य मनुस्मृतींतील इतर वचनांशीं जुळत नाहीं. ह्यावरून सांप्रतची मनुस्मृति ही महाभारतांतील अनुशासन पर्वानंतर झाली, हें देखील सिद्ध होतें. १५ व्या श्लोकांत 'नातिबालाम्' ह्याबद्दल 'न स्त्रीं बालाम्' असाहि एक पाठ आहे. ७ व्या श्लोकांत 'दशवर्षाम्' ह्या पाठाबद्दल 'षोडशाब्दां' असा पाठ निर्णयसिंधुकारांनीं मुलींच्या विवाहाच्या प्रकरणांत दिला आहे व तोच मूळचा पाठ असला पाहिजे. कारण त्या श्लोकाच्या द्वितीयार्धांत वधूवरांच्या वयांत जसें १४ वर्षांचें अंतर सांगितलें आहे तितकेंच अंतर षोडशाब्दां ह्या पाठानें वधूवरांच्या वयांमध्यें पूर्वार्धांत दाखविलें जातें. ह्याशिवाय 'दशवर्षाम्' ह्याला 'नग्निकाम्' (म्हणजे ऋतु प्राप्त न झालेली) असें विशेषण लावण्याची गरज नाहीं. 'षोडशाब्दां' ह्यालाच 'नग्निकाम्' हें विशेषण लावण्याची गरज आहे. मद्रास Recension मधील टीपेवरून असें दिसतें कीं २० व्या श्लोकाचा उत्तरार्ध व २१ वा श्लोक कांहीं हस्तलिखितांत सांपडत नाहीं. २१ व्या श्लोकाचा पूर्वार्ध आणि सांप्रतच्या मनुस्मृतींतील तिसऱ्या अध्यायांतील ५ व्या श्लोकाचा पूर्वार्ध एकच आहे. या पूर्वार्धाचा पाठ याज्ञवल्क्यस्मृतींतील ५३ व्या श्लोकाच्या टीकेंत मिताक्षराकारानें 'असपिंडाच या मातुः असपिंडा च या पितुः' असा दिला आहे. आणि त्या पाठावरून त्यानें सिद्धांतहि काढलेला आहे (अत्र च सपिंडामित्यनेन पितृस्वस्रमातृस्वस्रादिदुहितृनिषेधः). ह्यावरून दिसेल कीं, हा २१ वा श्लोक महाभारतांत कोणीतरी प्रक्षिप्त केला आहे किंवा निदान त्याचा शुद्धपाठ 'असगोत्रा' ह्याऐवजीं 'असपिंडा' हा मूळच्या मनुस्मृतींत आणि महाभारतांतहि असला पाहिजे. ह्या निर्णयास आधार देणारीं अशीं दुसरींहि जोरदार प्रमाणें आहेत. मनुस्मृतीमध्यें मूळचा पाठ 'असगोत्रा' च होता असें मानलें तर मनुस्मृति, पितृसपिंड स्त्रीशीं विवाहास मनाई करीत नाहीं असा भलताच निर्णय प्राप्त होतो. कारण अशी मनाई मनुस्मृतींत इतरत्र कोठेंच केलेली नाहीं. शिवाय इतर निषिद्ध विवाहास शिक्षा सांगितली असली तरी असगोत्र विवाहास मनुस्मृतीमध्यें शिक्षा सांगितली नाहीं. मनुस्मृतीमध्येंच जर मूळचा पाठ 'असपिंडा' होता असें ठरलें तर महाभारतांतील मूळचा पाठ 'असपिंडा' च असला पाहिजे असें सिद्ध होतें. एकूण वरील महाभारतांतील वचनांत ज्यांचे विवाह निषिद्ध आहेत, असे नातलग इतर कोणत्याच श्लोकांत सांगितले नाहींत. म्हणून हा २१ वा श्लोक महाभारतांत मूळचा असलाच पाहिजे आणि त्याचा दुसऱ्या पादाचा पाठ 'असपिंडा च या पितुः' असा असला पाहिजे असें सिद्ध होतें.



अणुक्रमणिका

असें दिसून आल्यास त्याला मुलगी उदकासहित द्यावी ॥ ३ ॥ चांगल्या ब्राह्मणांचा असा धर्म आहे कीं, मुलीला अनुरूप अशा वराला आमंत्रण करून बोलवावें आणि त्याला ती मुलगी द्यावी. चांगल्या क्षत्रियांचा असा धर्म आहे कीं ॥ ४ ॥ तिची जो इच्छा करीत असेल आणि ज्याला ती मुलगी इच्छीत असेल, अशा वराला आपल्या पसंतीच्या वराचा त्याग करूनहि बापानें मुलगी द्यावी ॥ ५ ॥ धर्मशास्त्रांचा ज्यांनीं चांगला विचार केला आहे, ते अशा विवाहाला गांधर्वविवाह असें म्हणतात ॥ ६ ॥ पैसा देऊन मुलगी विकत घेऊन तिच्याशीं विवाह करणें ह्याला शहाणे लोक असुरांचा धर्म आहे, असें म्हणतात ॥ ७ ॥ मुलीच्या नातलगाला मारून ते रडत असतां त्यांचीं डोकीं कापून, रडत असणाऱ्या मुलीला जबरदस्तीनें तिच्या घरांतून नेणें हा राक्षसांचा धर्म होय ॥ ८ ॥ झोपीं गेलेल्या, दारू पिऊन मत्त झालेल्या मुलीशीं मैथुन करणें हा पिशाचांचा, अर्थात् सर्वांत वाईट आणि पापिष्ठ असा, विवाहाचा प्रकार होय ॥९॥ हे युधिष्ठिरा, ह्या विवाहाच्या पांच प्रकारांपैकीं तीन धर्म्य आहेत आणि दोन अधर्म्य आहेत. पैशाच व आसुर ह्या विवाहप्रकारांचा कधींच आश्रय करूं नये ॥ १० ॥ ब्राह्म, गांधर्व आणि क्षात्र—म्हणजे वर ज्याला राक्षस म्हटलें आहे तो—हे जे विवाहाचे तीन प्रकार आहेत, ते चांगले आहेत. हे शुद्ध स्वरूपांत किंवा मिश्र स्वरूपांत आचरणांत आणावेत ह्यांत शंका नाहीं ॥ ११ ॥ ब्राह्मणानें ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य ह्या तीन वर्णांतील मुलीशीं विवाह करावा. क्षत्रियानें क्षत्रिय आणि वैश्य ह्या दोन वर्णांतील मुलीशीं विवाह करावा. अशा वर्णांच्या मुलींपासून जी संतति होते, ती सारखीच म्हणजे बापाच्या वर्णाची होते ॥ १२ ॥ तथापि ब्राह्मणानें ब्राह्मणाच्याच मुलीशीं विवाह करावा हें सर्वांत चांगलें, केवळ उपभोगाकरितांच शूद्र स्त्रीशीं विवाह करावा असें कोणी म्हणतात व कोणी तसें करूं नये असेंहि म्हणतात ॥१३॥ शूद्रेच्या ठिकाणीं मुलगा उत्पन्न व्हावा ह्या गोष्टीची चांगले लोक स्तुति करीत नाहींत. ब्राह्मणास शूद्रेपासून जर मुलगा झाला तर त्यानें प्रायश्चित्त केलें पाहिजे ॥ १४ ॥ संततीची इच्छा करणारे कांहीं लोक अतिशय लहान मुलीशीं विवाह करीत नाहींत. कारण तिच्यापासून संतति होण्याची त्यांना खात्री वाटत नाहीं (अनित्यत्वात्). परंतु दुसरे जे कांहीं कर्मठ लोक आहेत ते मुलीची अंतःशुद्धि असावी ह्या हेतूनें अति लहान मुलीशीं विवाह करतात ॥ १५ ॥ दुसऱ्या कुटुंबांत उत्पन्न झालेल्या आणि निद्राविकार वगैरे विकार नसलेल्या मुलीशीं लग्न करावें. जिच्याशीं लग्न करूं नये असें शास्त्र म्हणतें, अशा मुलीशीं देखील आपत्प्रसंगीं विवाह करावा, असें कोणी म्हणतात ॥ १६ ॥ तीस वर्षांच्या मनुष्यानें १६ वर्षें वयाच्या पण ऋतुस्नात न झालेल्या मुलीशीं लग्न करावें किंवा एकवीस वर्षांच्या मनुष्यानें ७ वर्षांच्या मुलीशीं लग्न करावें ॥ १७ ॥ ज्या मुलीला भाऊ, बाप किंवा आई नसेल अशा मुलीशीं लग्न करूं नये. कारण ती पुत्रिका असते. म्हणजे तिची संतति तिच्या बापाची संतति होते, तिच्या नवऱ्याची संतति होत नाहीं ॥१८॥ ऋतु प्राप्त झालेल्या मुलीनें आपला बाप किंवा दुसरा कोणी तरी पालक आपणांस कोणा तरी पतीला देईल ह्याचीं तीन वर्षें वाट पहावी. परंतु चवथें वर्ष प्राप्त झाल्यानंतर तिनें स्वतः वर वरावा ॥ १९ ॥ तिनें स्वतः वर वरला म्हणजे तिच्या उपभोगाला किंवा तिच्या संततीला कोणत्याच प्रकारचा कमीपणा येत नाहीं. ह्याविरुद्ध जी कन्या वर्तन करील, ती प्रजापतीच्या मतानें दोषी ठरते ॥ २० ॥ मनून असा नियम करून दिला आहे कीं, जी मुलगी आईची सपिंड नसेल किंवा बापाची सपिंड नसेल, तिच्याशीं विवाह करावा ॥ २१ ॥

### "अन्वया"चा अर्थ

चौथ्या श्लोकांतील 'अनुरूपेणे' ह्याच अर्थाचा 'अनुकूलिनें' हा शब्द, आणि तिसऱ्या श्लोकांतील 'गुणवते' हा शब्द हे असें दाखवितात कीं, त्या दिवसांत पति आणि पत्नी ह्यांमध्यें साम्य असणें आवश्यक मानलें जात होतें. ज्या मुलीशीं विवाह करूं नये त्या मुलीचें वर्णन करतांना 'अपरान्वयसंभूताम्' आणि 'असपिंडाम्' असे शब्द योजिले आहेत. ह्या शब्दांचा खरा अर्थ काय ? मूळच्या मनुस्मृतिमध्यें त्या शब्दांना, मागें उद्धृत केलेल्या शत-

पथ ब्राह्मणाच्या वचनांत जो अर्थ आहे, तोच अर्थ असला पाहिजे. अन्वय हा शब्द इ किंवा अय् ह्या धातूला अनु हा उपसर्ग लागून त्यापासून झाला आहे. अनु उपसर्ग लागल्यानें त्या धातूंचा अर्थ अनुसरणें, मागाहून जाणें असा होतो. म्हणून अन्वय ह्या शब्दाचा यौगिक अर्थ "अनुयायांचा संघ, समूह" असा होतो. समाज जेव्हां भटकण्याच्या अवस्थेंत होता, तेव्हां त्यांतील व्यक्ति एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं भटकत असत; आणि त्यांचें कुटुंब म्हणजे बायको आणि मुलें त्याच्या मागोमाग जात असत. अशा अवस्थेंतच 'अन्वय' ह्याचा अर्थ कुटुंब असा होऊं लागला. कुटुंबामध्यें मनुष्याचे वंशज असतात म्हणून अखेरीस अन्वय ह्याचा कोणाहि मनुष्याचे सर्व वंशज, असा अर्थ होऊं लागला होता. हा त्याचा रूढार्थ होय. हा अर्थ फार विस्तृत आहे; कारण कुटुंब बहुधा कोणाहि मनुष्याची नातवंडें मोठीं झालीं असतां विभक्त होतें आणि कुटुंबामध्यें पणतूंचा अंतर्भाव बहुधा नसतो. म्हणून 'अन्वय' याचा मूळचा अर्थ मनुष्याचीं मुलें आणि नातू एवढाच आहे. तथापि त्याचा विस्तृत अर्थ मनुष्याचे सर्व वंशज असा आहे. सध्यां ज्या वचनाचा आपण विचार करीत आहोंत, त्या वचनांत 'अन्वय' ह्या शब्दास वर दाखविलेला विस्तृत अर्थ,नव्हता असें ठरविणें आपणांस भाग आहे. कारण अन्यपक्षीं श्रीराम व त्यांचे बंधु ह्यांचे सीता व तिच्या चुलतबहिणी ह्यांच्यांशीं विवाह, ते एकाच वैवस्वत मनूचे वंशज असल्यामुळें, होऊं शकले नसते. म्हणून 'अपरान्वयसंभूताम्' ह्या वाक्यानें असें सूचित केले आहे कीं, मनुष्यानें आपल्याच बहिणीशीं किंवा चुलत-बहिणीशीं विवाह करूं नये. पण चुलत-चुलत-बहिणीशीं किंवा नातलगाशीं विवाह करावा. शतपथ ब्राह्मणांतील 'चतुर्थे पुरुषे संगच्छावहै' ह्या वचनाशीं हा निर्णय उत्तम रीतीनें जुळतो, हें पुढें दिलेल्या वंशवृक्षाच्या मदतीनें सहज समजून येईल.




## सपिंड म्हणजे कोण ?

'सपिंड' ह्या शब्दाचेहि दोन अर्थ टीकाकारांनीं दिलेले आहेत; पण फार प्राचीन काळीं तिसराहि एक अर्थ चालू असेल, हें संभवतें. तो अर्थ असा कीं, एकाच ठिकाणीं जेवणारीं माणसें तीं सपिंड होत. असा हा तिसरा अर्थ आहे. वरील २१ व्या श्लोकांत सपिंडाचा हा अर्थ घेतला तर शतपथ ब्राम्हणांतील नियमच त्यांतून निघतो. कारण ह्या अर्थाप्रमाणें कोणाहि स्त्रीचे सपिंड तिचे भाऊ आणि बहिणी हेच असूं शकतात. तिच्या भावाच्या किंवा बहिणीच्या मुली किंवा मुलें, तिचे सपिंड असूं शकत नाहींत. कारण ती आपल्या लहानपणीं फक्त आपले भाऊ व बहिणी ह्या बरोबरच जेवत असते. पुरुषाचे सपिंड त्याचे मुलगे, मुली, नातू व नाती हीं होत. कोणाहि मनुष्यास आपल्या पणतूशीं किंवा पणतशीं जेवण्याचा प्रसंग क्वचितच येतो आणि म्हणून ते त्याचे सपिंड नव्हत. कोणाहि मनुष्याच्या बहिणीची मुलगी, त्याच कारणामुळें त्याची सपिंड नव्हे. पुरुष आणि स्त्री यांचे सपिंड वर दिले तेवढेच फक्त आहेत. आणि ह्यांचाच त्याग करण्यास शतपथ ब्राह्मण सांगतें. म्हणून सपिंड म्हणजे एकत्र जेवणारे नातलग हा सपिंडाचा अर्थ पूर्वी होता, हा निर्णय आपण टाळूं शकत नाहीं. एकंदरींत असें दिसून येतें कीं, वर आम्ही सपिंडाचा जो अर्थ सिद्ध केला, त्या अर्थाप्रमाणें जे सपिंड ठरतील, त्यांच्याच विवाहाला पूर्वी प्रतिबंध होता असें ठरतें.

ह्याप्रमाणें फार प्राचीनकाळीं विवाहाचा कायदा कसा होता हें आम्ही दाखविलें आहे. ह्यांत बदल कसकसा होत गेला हें पुढील लेखांत दाखवूं.

---

# अर्ध - कथानक

[ तीनशें वर्षांपूर्वीचें एक आत्मचरित्र–पूर्वार्ध ]

प्रा. महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार

अर्ध–कथानक हें एक आत्मचरित्र आहे. सुमारें तीनशें वर्षांपूर्वी बनारसीदास नांवाच्या कवीनें हें लिहिलेलें आहे. आपल्यांकडील भाषांतून आत्मचरित्रें क्वचितच लिहिलेलीं आढळतात. सुप्रसिद्ध बाबर बादशहा यानें लिहिलेलें आत्मचरित्र हा एक अपूर्व ग्रंथ समजला जातो. त्याच्या तोडीचें पुस्तक हिंदुस्थानांत तर दुसरें एकहि नाहीं. बाबरचें आत्मचरित्र, त्याचें विस्तृत आणि मार्मिक निरीक्षण, त्याची खेळकर आणि विनोदी वृत्ति, त्याच्या आयुष्यांत ओढवलेले विविध आणि रोमहर्षण प्रसंग, त्याची रसिकता, त्याची मनुष्यपरीक्षा, त्यांचे छंद, इत्यादी विविध गोष्टींचें अत्यंत मनोज्ञ वर्णन आपणांस त्यांत वाचावयास मिळतें.

## आत्मचरित्राची अपूर्वता

मराठी भाषेंत तर जुन्याकाळीं लिहिलेलीं आत्मचरित्रें अत्यंत विरळच आहेत. नाना फडणवीस यानें आपल्या पूर्वायुष्याचें वर्णन करणारें, एक लहानसें टिपणवजा आत्मचरित्र लिहिलेलें उपलब्ध आहे. लहानच असलें तरी, नानाच्या विषयीं त्याच्याच मुखांतून मोकळेपणानें बाहेर पडलेली आणि एरव्ही अन्य कोणत्याहि मार्गानें उपलब्ध होण्यास कठीण असलेली, अशी किती तरी विश्वसनीय आणि मनोरंजक माहिती आपणांस तेथें मिळते. गंगाधरशास्त्री पटवर्धन, जे दुसऱ्या बाजीरावाच्या वेळीं बडोद्याचे वकील होते, त्यांनींहि आपलें एक आत्मचरित्र लिहिलेलें उपलब्ध आहे. अशीं हीं एक दोन किरकोळ आत्मचरित्रें सोडलीं, तर इंग्रजी अंमलापूर्वी लिहिलेलीं आत्मचरित्रें आमच्याकडे नाहींतच असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं.

अशा स्थितींत कवि बनारसीदास यानें सुमारें तीनशें वर्षांपूर्वी लिहिलेलें आत्मचरित्र ही एक खरोखरच नवलाची गोष्ट आहे. हें आत्मचरित्र अत्यंत सोप्या भाषेंत, परंतु कवितेंत लिहिलेलें आहे. कौतुकाची गोष्ट अशी कीं, बनारसीदास यानें आपलें आत्मचरित्र अत्यंत प्रांजळपणें सांगितलें आहे. कसलीहि लपवाछपवी केलेली नाहीं. त्याच्या आयुष्यांत अनेक विचित्र घटना घडून आलेल्या आहेत. **तीनशें वर्षांपूर्वीच्या समाजाचें जीवन** समजून घेण्यास या अपूर्व आत्मचरित्राचा अतिशय उपयोग होणार आहे. म्हणून त्याचा परिचय करून देण्याचें येथें योजिलें आहे.

बनारसीदास हा श्रीमाळी जैन आहे. ‘अर्धकथानक’ या नांवाचें त्यानें लिहिलेलें जें आत्मचरित्र त्याचाच येथें विशेष विचार करावयाचा आहे. आपल्या या ग्रंथांत व इतर ग्रंथांत बनारसीनें जे धार्मिक विचार प्रकट केलेले आहेत, त्यासंबंधीं विशेष चर्चा करण्याचा आमचा विचार नाहीं. तो दिगंबरपंथी होता कीं श्वेतांबरपंथी होता, कीं कांहीं अंशीं दोन्ही पंथांतील सारासार विचार घेणारा होता, याबद्दल ‘अर्धकथानकाचे’ संपादक प्रसिद्ध जैन विद्वान् मुंबईचे पंडित नाथुराम प्रेमी यांनीं व इतर जैन विद्वानांनीं जी चर्चा केली आहे, त्या चर्चेंतहि आपणांस शिरावयाचें नाहीं. बनारसीच्या भाषेसंबं-

धानें कांहीं मनोरंजक गोष्टी अधुनमधून वाचकांच्या नजरेस आणणें अवश्य असलें तरी, प्रो. हिरालाल जैन प्रभृतींनीं बनारसीच्या भाषेच्या स्वरूपाविषयीं जी व्याकरणविषयक चर्चा केली आहे, तिचाहि आम्हांस येथें विचार करावयाचा नाहीं. तर, जहांगीर, शहाजी आणि शहाजहान यांच्या वेळच्या एका साधारण नागरिकानें मन मोकळें करून जें आत्मचरित्र निवेदन केलें आहे, त्यांतील कांहीं लक्षांत घेण्याजोग्या गोष्टींचाच परिचय आपणांस करून द्यावयाचा आहे. आणि या कामासाठीं बनारसीदासाच्या जबानीसारखें अन्य साधन आज तरी आपल्या समोर नाहीं. युरोपियन प्रवाश्यांचीं वर्णनें आहेत, पण तीं अर्थात् परकीयांच्या दृष्टीनें लिहिलेलीं आहेत. कागदपत्रें किंवा काव्येतिहास ग्रंथहि आहेत पण त्यांना केव्हांहि अशा आत्मचरित्रांची सर येणार नाहीं. तीनशें वर्षांपूर्वींच्या सामान्य नागरिक जीवनाच्या चित्रणाला बनारसचिं 'अर्ध–कथानक' हें एक अद्वितीय साधन आहे, एवढें वाचकांनीं लक्षांत घ्यावें.

आतां या 'अर्ध-कथानकांत' बनारसीनें शेवटीं म्हटल्याप्रमाणें—

सब दोहा अरु चौपई,
छसै पिचत्तरिमान।
कहहिं, सुनहिं, वांचहिं पढ़हिं
तिन सबकौ कल्यान ॥ ६७५ ॥

या काव्यांत एकूण दोहे व चौपई मिळून सहाशें पंचाहत्तर कविता आहेत. त्यांतून लक्षांत घेण्याजोग्या गोष्टी बनारसीच्या लिहिण्याच्या क्रमाप्रमाणें आतां सांगूं. काव्याच्या आरंभींच कवि म्हणतोः—

जैसी सुनी बिलोकी नैन।
तैसी कछू कहौं मुख बैन ॥

आपण जें पाहिलें व ऐकलें तेंच सांगणार, अशी प्रतिज्ञा केली आहे; आणि तें—

मध्यदेसकी बोली बोलि।
गर्भित बात कहौं हिअ खोलि ॥

'हृदय खोलून मध्यदेशाच्या बोलींत तुम्हांला सांगतों. मित्रांनों, कान देऊन ऐका' असें बनारसी म्हणतो.

## हिंदी-फारसी दोन्हींचें शिक्षण

आपला आजा मूळदास आणि त्याच्या पूर्वींची कुलपरंपरा सांगून आपण मूळचे 'राजवंस रजपूत' होतों, आणि रोहतकपूर (आजचें रोहटक—पंजाब)-नजिकच्या विहोली गांवचे मूळचे रहाणारे होतों ते पुढें जैन झालों, असें सांगून मूळदासाबद्दल कवि लिहितो, 'पढ्यौ हिंदुगी पारसी'. म्हणजे मूळदास हिंदी आणि फारसी दोन्ही भाषा शिकला. तत्कालीन शिक्षणप्रसाराबद्दल यावरून आपणांस कांहीं निश्चित अनुमान करतां येतें. आणि तें असें कीं, सगळे नसले तरी निदान व्यापारी वर्गांतील बरेच लोक **हिंदी आणि फारसी या दोन्ही भाषांचें अध्ययन** त्या काळीं करीत असत व लिहिण्यावाचण्यांत तरबेज होत असत. अलीकडे आपल्याकडील विद्वानांत सुद्धां, पूर्वींच्या काळीं कोणत्या वर्गांत किती शिक्षणप्रसार होता, याविषयीं पुष्कळ विचित्र कल्पना रूढ असलेल्या आढळतात. बनारसीच्या आजाचा काळ म्हणजे अकबराचा पूर्वकाल, हें लक्षांत घेऊन, मूळदासाच्या शिक्षणाबद्दल बनारसीनें केलेलें वरील विधान आपण नीट लक्षांत ठेविलें पाहिजे. हा मूळदास विहोलिया मोंगलांच्या पदरीं मोदीगिरीच्या म्हणजे कोठीखात्याच्या कामावर माळव्यांत नरवर येथें आला. तेथें सं. १६०८ (इ. स. १५५१) मध्यें बनारसीचे वडील खरगसेन यांचा जन्म झाला. सं. १६१३ (इ. स. १५५६) मध्यें मूळदास मेला. तेव्हां लहानशा खरगसेनाला घेऊन त्याची आई पूर्व देशामध्यें जौनपुरला आली. कारण मूळदासाच्या मालकानें—मोगल जहागिरदारानें—"मुहर छाप घर खालसै कीनौ लीनौ माल— ॥ २२ ॥" मूळदासाची मालमत्ता जप्त केली आणि बनारसीचा बाप पांच वर्षांचा असतांना अनाथ झाला. हा जप्तीचा प्रकार लक्षांत घेण्यासारखा आहे.

## छत्तीस प्रकारचे शूद्र

गोमती नदीच्या कांठीं वसलेल्या जौनपुराचें वर्णन करतांना बनारसी म्हणतो,

चौपई चारौं बरन बसैं तिस बीच।
बसहिं छतीस पौंन कुल नीच ॥
बांभन छत्री, बैस अपार
सूद्र भेद छत्तीस प्रकार ॥ २८ ॥



अणुक्रमणिका

आपल्याकडे कारुनारू म्हणतात, त बनारसीनें कसे समाविष्ट केले आहेत, हें लक्षांत येईल. कारण हें वर्णन पौराणिक नसून एका समकालीन जैन व्यापारी कवीनें केलेलें आहे:—

### सवैया इकतीसा

सीसैगर, दरजी, तंबोली, रंगवाल, ग्वाल। बाढई, संगतरास, तेली, धोबी, धुनिआ॥ कंदोई, कहार, काछी, कलाल, कुलाल, माली,। कुंदीगर, कागदी, किसान, पटबुनिआ॥ चितेरा, बिंधेरा, बारी, लखेरा, ठठेरा, राज। पटुवा, छप्परबंध, नाई भार—भुंनिया॥ सिकैलीगर, हवाईगर, सुनार, लुहार धीमेरे, चमार एइ छत्तीस पउनिया॥ २९॥

या यादींत कागदी, संगतरास, हवाइगर वगैरे मुसलमानी शब्द किती मिसळलेले आहेत हें लक्षांत घेण्यासारखें आहे.

### वैभवशाली जौनपूर

यानंतर बनारसी जौनपूरचें वैभव व इतिहास थोडक्यांत सांगतो. हें खरें आहे कीं, जौनपूर हें शर्की मुसलमानांच्या अमदानींत अत्यंत भरभराटीला आलें होतें. व्यापार, विद्या आणि वैभव यांनीं संपन्न झालें होतें. तथापि, बनारसी जौनपुरांत बावन सराया, बावन बाजार व बावन मंडई होत्या असें जें वर्णन करतो, तें परमार्थानें घेतां येण्यासारखें नाहीं. जौनपुरांत,

"मठ, मंडप, प्रासाद उतंग
सोभित सपत खने ग्रहधने
सघन पताका, तंबू तने॥ ३०॥"

असल्याचें वर्णन करतो, तें खरें समजण्यास चिंता नाहीं. मठ आणि पताका शब्दांवरून जैन, हिंदू इत्यादिकांचीं देवस्थानें जौनपुरांत पुष्कळ असावींत असें दिसतें. जौनपूर ऊर्फ शर्की राज्याची सीमा पूर्वेस पटणा, पश्चिमेस इटावा, दक्षिणेस

"हुत पुव्व पुरखा परधान
तिनके बचन सुने हम कान"
"जुन्या लोकांकडून ऐकून मी लिहिलेलें आहे."

कारण,

"मृषा दोष नहिं लागै एम"

असो. याप्रमाणें बनारसीचा बाप आणि त्याची आई हीं माहेरीं आपल्या बापाकडे म्हणजे मदनसिंगाकडे जौनपूर येथें आलीं. बापानें मुलीचें सांत्वन केलें, आणि म्हणाला "जैसा घर तैसी ननसाल"

### बनारसी शाळेंत जातो

बनारसीला आठएक वर्षें लागलीं तेव्हां तो शाळेंत गेला. बनारसी म्हणतो,

"पढि चटसाल भयौ व्युतपन्न,
परखै रजत टका सोवन्न
गेह उचापति लिखै बनाइ,
अत्तो जमा कहै समुझाइ
लहना देना विधिसौं लिखै
बैठे हाट सराफी सिखै"

याप्रमाणें बनारसीला लिहिणें, वाचणें आणि व्यापारी टिपण—टापणाचें शिक्षण मिळाल्याचें तो सांगतो. येथें खरगसेनाला लोधीखानाचा दिवाण धन्नाराय याच्या कृपेनें पोतदारीचा व्यवसाय मिळाल्याचें बनारसी सांगतो.

### समाजांतील भोळेपणा

बनारसीच्या लिहिण्यांत कारकून, तहसील, खजाना फारकत, दिलासा वगैरे अनेक मुसलमानी शब्द जागजागीं आले आहेत, हें लक्षांत घेण्यासारखें आहे. कांहीं दिवसांनीं धन्नाराय सुलतानाच्या परवानगीनें जैनांचा संघ घेऊन संमेतशिखरजीच्या यात्रेला निघाला. धन्नाराय जो आला तो उदराचा विकार होऊन वारला. खरगसेनाला पुनः पंचाइत पडली. कसाबसा तो जौनपुरांत आला व तेथून पुढें आग्र्यास

---

१ कांचकाम करणारा, २ सुतार, ३ पाथरवट, ४ पिंजारी, ५ हलवाई, ६ मजूर, ७ कल्ली, ८ इस्त्री करणारा, ९ वस्त्र विणणारा, १० चित्रकार, ११ मांग, १२ द्रोणपत्रावळी लावणारा, १३ लाखेच्या बांगड्या करणारा, १४ तांबट, १५ गवंडी, १६ पटवारी, १७ न्हावी, १८ भडभुंजा, १९ हत्यारें करणारा, २० शोभेची दारू करणारा, २१ कोळी.

गेला. तेथें सुंदरदास पित्तियाच्या बरोबर त्यानें व्यापार केला. पुढें चार वर्षांनीं मेरठ येथें त्याचें लग्न झालें. " चाची सौं नहिं बनी, लियौ न्यारो घर दंपति. " अर्थात् खरगसेनानें नवें बिऱ्हाड केलें. पुढें सुंदरदास मेला तेव्हां सं. १६३३ त खरगसेन जौनपुराला आला. येथें आगरवाल जातीच्या रामदास नांवाच्या श्रीमंत बनियाबरोबर त्यानें भागींत व्यापार केला. नंतर एकदां खरगसेन आपली कुलदेवता 'रोहतककी सती औत' हिच्या यात्रेला गेला (सं. १६३७). तेव्हां वाटेंत चोरांनीं सर्व लुटून नेलें व एका वस्त्रानिशीं ते परत आले. यावर बनारसी पुढीलप्रमाणें टीका करतो—

गए हुते मांगनकौ पूत,
यहु फल दिनौ सती अऊत
तऊ न समुझे मिथ्या बात,
फिरि मानी उनहींकी जात (यात्रा)
पगटरूप देखैं सब सोग,
तऊ न समुझें मूरख लोग ॥ ८० ॥

यावरून बनारसी स्वतंत्र विचार करणारा होता हें स्पष्ट दिसतें. असें असतांनाहि यानें स्वतः सुद्धां अशाच प्रकारच्या गोष्टी केल्या आणि आपल्या थोबाडींत मारून घेतली. मनुष्य–स्वभाव हा कोठेंहि सारखाच असतो. पुढें सं. १६४१त याचा आजा मदनसिंग मेला. आणि १६४३ त विक्रमजित म्हणजेच बनारसी याचा जन्म झाला. तेव्हां हें कुटुंब पार्श्वनाथाच्या यात्रेला गेलें. तेथें पुजाऱ्यांनीं मोठा श्वास ओढून, 'कपटी' ध्यान लावून, डोकें घुमवून सांगितलें कीं, मला स्वप्नांत प्रत्यक्ष यम भेटला आणि त्यानें सांगितलें कीं, या मुलाला पार्श्वनाथाच्या जन्मगांवचें नांव ठेवा म्हणजे कसलीहि चिंता राहणार नाहीं. याप्रमाणें विक्रमजित हा बनारसीदास झाला. दुर्दैवानें या मुलाला संग्रहणी आणि देवी यांची मोठी पीडा सोसावी लागली. नंतर मागें सांगितल्याप्रमाणें

" आठ बरसको हूओ बाल
विद्या पठन गयौ चटसाल
गुरु पांडेसौं विद्या सिखै
आक्खर बांचै लेखा लिखै
बरस एक लौं विद्या पढी
दिन दिन अधिक अधिक मति बढी
विद्या पढी हुओ बितपन्न
संवत सोलह सै बावन्न " ॥ ९९ ॥

## बनारसीचें लग्न होतें

नवव्या वर्षी खैराबादचे परबत तांबी यांचा मुलगा कल्याण याची बहीण बनारसीला सांगून आली. तो प्रकार येणेंप्रमाणें—

तासु पुरोहित आइऔ,
लीनै नाऊ साथ
पत्र लिखित कल्यानकौ
दियौ सेनके हाथ
करी सगाई पुत्रकी,
कीनौ तिलक लिलाट
बरस दोई उपरांत लिखि,
लगन व्याहकौ ठाट ॥ १०३ ॥

पुरोहिताच्या बरोबर नाऊ म्हणजे न्हावी देऊन सगाई किंवा वाङ्‌निश्चय झाला आणि दोन वर्षांनीं लग्न करावयाचें ठरलें. यानंतर—

" भई सगाई बावनें, पऱ्यौ त्रेपनें काल
महगा अंन न पाइयै, भयौ जगत बेहाल "

असा ५३ संवतांत मोठा दुष्काळ पडला. चौपन्न सालीं बनारसीचा विवाह झाला. घरीं आले, तों खरगसेनाला एक मुलगी झाली आणि त्याच दिवशीं त्याची वृद्ध आजी मेली. तेव्हां बनारसी म्हणतो—

नानी (आजी) मरन सुता जनम,
पुत्रवधु आगौन (आगमन)
तीनौ कारज एक दिन, भए एकही भौन (घर)
यह संसार बिडम्बना, देखि प्रगट दुखखेद
चतुर चित्त त्यागी भए, मूढ न जानहि
भेद ॥ १०८ ॥

## जव्हेऱ्यांवर जुलूम

पुढें लवकरच जौनपुरांत तेथील हकीम नबाब किलीचखानानें एक दिवस सर्व जव्हेरी पकडून कोंडून ठेविले. 'बडी वस्तु माँगै कछू सो तो इनपै नहिं.' मग एक दिवस सकाळींच उठून सगळ्या जव्हेऱ्यांना चोरांसारखें बांधून " हने कटीले कोरडे कीनें मृतक समान " असा जुलूम केला. पुढें त्यानें त्यांना सोडून दिलें तेव्हां सर्वांनीं जमून गांव सोडण्याचा विचार केला. त्याप्रमाणें फुटून फाटून



अणुक्रमणिका

चौघे चार दिशेला गेले. त्यांत खरगसेन कडामाणिकपुराजवळ साहिजादपुरांत आला.

## नमुनेदार आतिथ्य

त्यावेळीं जिकडे तिकडे घनघोर अंधःकार आणि वरून पावसाची संतत धार अशा कचाट्यांत सांपडला. कुठें बसायला जागा नाहीं. तों रात्रीचा एक प्रहर गेल्यावर कुणी खरगसेनाला मोठ्यानें हांक मारूं लागलें. आणि खरगसेनापाशीं येऊन " राम राम करी बैठ्यौ पास, बोल्यौ तुम साहब मै दास ". मग या करमचंदानें खरगसेनाला आपल्याकडे नेला, आणि खरगसेन घरीं येऊन पाहतो तों आश्चर्यानें थक्क झाला. कारण

बैठे सुखसौं करि विश्राम,
देख्यौ अति विचित्र सो धाम
कोरे कलस धरे बहु माट,
चादरि सोरि तुलाई खाट
भर्‍यौ अंनसौं कोठा एक,
भरव्य पदारथ अवर अनेक ॥

अशा प्रकारें आपण होऊन बोलावून आपलें सर्व घर अशा फिरस्त्या पाहुण्यांच्या हवालीं करणारा करमचंदासारखा अतिथिपूजक त्यांस भेटला. त्यानें आपलें घर खालीं करून आपण दुसर्‍या घरांत जाऊन राहिला. खुद्द बनारसी म्हणतो

घन बरसै पावस समै,
जिन दीनौ निज भौन
ताकी महिमाकी कथा
मुखसौं बरनै कौन ॥ १२६ ॥

या विषयाला अनुलक्षून कवीनें पुढील विचार प्रकट केले आहेत

" वह दुख दियौ नबाब किलीच,
यहु सुख साहिजादपुरबीच
मूढ़पुरुषकी दिष्टिमैं दिसैं सुखदुख दोइ
ग्यानी संपत्ति विपत्तिमैं, रहै एकसी भांति ॥"

## बनारसी व्यापार करूं लागतो

तेथून खरगसेन प्रयागास गेला. आणि छोटा-बनारसी घरीं राहून 'कौडी बेच बनिज तिन गह्यौ' कवडी कवडी खर्च करून व्यापार करूं लागला. या व्यापारांत

एक टका द्वै टका कमाइ, काहूकी ना धरै तमाइ
जोरै नफा एकठा करै,
लै दादीके आगैं धरै ॥

मग आजी या छोट्या व्यापार्‍याचें कौतुक असें करी—

दादी बांटै सीरनी, लाडू निकुती नित्त
प्रथम कमाई पुत्रकी, सती अऊत निमित्त ॥

आणि बुंदीच्या लाडूंची शेरणी वाटत असे. यावर बनारसीनें दादीच्या भोळेपणावर 'ऐसी मूढ़ जीवकी जाति' अशी टीका करून

जैसी मति तैसी गति होइ

हें तात्पर्य काढलें आहे. नंतर आपण फत्तेपूरला गेल्याचें पत्र खरगसेनानें पाठविलें. तेव्हां

डोली द्वै भाडै करि कीनै च्यारि मजूर
सहित कुटुंब बनारसी आए फत्तेपूर ॥ १४० ॥

मध्यंतरीं एकदां बापाशीं वेबनाव झालेला सलीम याच्या झगड्याचें थोडें वर्णन आलें आहे. या नुरमखानच्या झगड्यांत प्रजा व्याकुळ झाली आणि महानगरी उजाड झाली, इत्यादि वर्णन बनारसीनें केलें आहे.

## बनारसीचा पुढील अभ्यास

या वेळीं बनारसीला १४ वें वर्ष लागलें, तेव्हां त्यानें पंडित देवदत्तापाशीं कांहीं अभ्यास केला—

" पढ़ी ' नाम माला ' सै दोइ ॥
और ' अनेकारथ ' अवलोइ
जोतिस, अलंकार, लघुकोक, खंडस्फुट सै च्यारि सिलोक "

यावेळीं अभ्यास करतां करतांच बनारसी भलत्याच वाईट मार्गाला लागला. देवदत्ताप्रमाणेंच तो जैन मुनि भानुचंद्रापाशींहि अभ्यास करी.

भानचंदपै विद्या सिखै
'पंचसंधि' की रचना लिखै
पढै सनातर बिधि अस्तोन,
फुट सिलोक बहु बरनै कौन
सामाइक पडिकोंना पंथ
' छंद' 'कोस ' 'सुतबोध' गरंथ
इत्यादिक विद्या मुख पाठ,
पढै सुद्ध साधै गन आठ



अणुक्रमणिका

## अभ्यासाबरोबर इष्कबाजी

याप्रमाणें जैन धर्मग्रंथांचाहि त्यानें अभ्यास केला. पण कवि स्वतःच सांगतो "कबहु आइ सबद उर धरै, कबहु जाइ आसिखी करै". आसिखी म्हणजे इष्कबाजी. याप्रमाणें हें चौदा वर्षांचें पोर इष्कबाजी करूं लागलें! या आपल्या छंदाचा उल्लेख कवीनें अनेक वेळां केला आहे.

कै पढना कै आसिखी
मगन दुहू रसमाहिं
खानपानकी सुध नहिं
रोजगार किछु नाहिं ॥ १८० ॥

बनारसीचें हें वर्णन आणि अलीकडील काळांतील परिस्थिति, यांची तुलना करणें बोधप्रद होईल. इष्कबाजीचा हा छंद इतका वाढला कीं, मध्यंतरीं सासुरवाडीला गेला असतां बनारसी भयंकर रोगानें पछाडला गेला. या रोगांत आपली परिस्थिति काय झाली, हें कवीच्या तोंडूनच ऐकणें बरें—

"भयौ बनारसीदासतन,
कुष्टरूप सरवंग (सर्वांग)
हाड़हाड़ उपजी विथा,
केस रोम भुवभंग
विस्फोटक अगनित भए हस्त चरन चौरंग"

आणि अशी अवस्था झाली, त्यावेळीं

"कोऊ नर साला ससुर भोजन करइ न संग
ऐसी असुभदसा भइ निकट न आवै कोइ"

यावरून बनारसीला झालेल्या दुर्धर रोगाची कल्पना कोणासहि करतां येईल. तथापि अशाहि अवस्थेंत,

"सासू और विवाहिता,
करहिं सेव तिय दोइ
जलभोजनकी लेहिं सुध,
देहिं आनि मुखमाहिं
ओखद ल्यावहिं अंगमें नाक मूंदि उठि जाहिं"

कवीनें आपली ही परिस्थिति अत्यंत मोकळेपणानें वर्णन केली आहे. कवीचें वय ह्या वेळीं पंधरा संपून सोळा लागण्याचें आहे. कवि हा जर प्रातिनिधिक मानला तर, त्यावेळची तरुण पिढी, निदान शहरांत तरी, किती व्यसनाधीन झाली होती, ह्याची कल्पना येईल. या आजारीपणांत कवि म्हणतो—

"इस अवसरपर नापित कोइ
ओखद पुरी खवावै सोइ
चने अलूने भोजन देइ,
पैसा टका किधू नहिं लेइ"

म्हणजे केवढें आश्चर्य! न्हावी लोकांत औषधी विद्या त्याकाळीं असे, हें आपणांस माहीत आहे. तथापि पोटांत देण्याचीं औषधें देणारे वरील न्हाव्यासारखे न्हावी, त्याकाळीं दुर्मिळच असतील. औषध देऊन न्हाव्यानें कसलाहि पैसा घेतला नाहीं याप्रमाणें सहा महिने औषध खाल्ल्यावर बनारसी बरा झाला. न्हाव्यानें कांहीं घेतलें नाहीं. 'तूं मुझ मित्र समान' अशी अखेर बनारसीनें त्याची प्रशंसा केली; आणि दहा दिवस न्हाव्यास ठेऊन घेतलें. बापानें मात्र बनारसीच्या बायकोला बनारसीबरोबर पाठविलें नाहीं. खरगसेनाला हें कळल्यावर त्यानें लाजेनें मान खालीं घातली व 'कुवचन कहे अनेक'. बनारसी पुनः मठांत जाऊन शिकूं लागले आणि पुनः 'कै पढ़ना कै आसिखी, पकरी पहली चाल'. मग खरगसेन पटण्याला गेले आणि बनारसी खैराबादेस जाऊन बायकोला घेऊन परत आले. जौनपुरांत बनारसी

"आए नगर जौनपुर फेरि,
कुल कुटुंब सब बैठे धेरि
गुरुजन लोक देहिं उपदेस,
आसिखबाज सुनैं दरवेस"

जैनांचे गुरु घरोघर जाऊन उपदेश करीत असत आणि बनारसीसारखे आसिखबाज, दरवेशी ज्याप्रमाणें अस्वलाच्या नाकांत दोरी घालून त्याला फिरवीत, तसें ऐकत रहात, अशी त्यावेळची सामाजिक अवस्था होती. बनारसी म्हणतो,

"बहुत पढ़ैं **बांभन अरुभाट**
**बनिक पुत्र तो बैठे हाट**
**बहुत पढ़ै सो माँगे भीख,**
मानहु पूत बड़ेकी सीख"

ब्राह्मण आणि भाट-चारण वगैरेहि पुष्कळ पाठांतर करीत. वाण्याचीं मुलें बाजारांत बसत. "अति शीक तो मागे भीक" अशी म्हणच पडली होती. परंतु बनारसीनें आपला मार्ग सोडला नाहीं.

"फिर पोसाल भानपै पढ़ैं,
आसिखबाजी दिनादिन बढ़ैं

"काहू कह्यौ न मानै कोइ, जैसी गति तैसी मति होइ" अशी सर्वत्र अंदाधुंदी होती.

## भोंदू संन्यासी आणि जोगी

या सुमारास बनारसीला एक संन्यासी भेटला. त्यानें एक मंत्र सांगून गुप्तपणें पायखान्यांत जप करायला सांगितला, "म्हणजे सकाळीं दारांत एक दिनार रोज मिळेल" असें संन्यासी बोलला. त्या लुच्चा संन्याश्याला महापुरुष समजून कागदावर तो मंत्र बनारसीनें लिहून घेतला आणि एक वर्षपर्यंत त्याप्रमाणें जप केला. पण दारामध्यें दिनाराचा पत्ता लागला नाहीं. याप्रमाणें हा गुप्तपणें केलेला व्यवहार आंगलट आला. तेव्हां बनारसीनें ही आपली गुप्त कथा बायकोला सांगितली. तिनें हें सर्व झूट आहे असें सांगितलें. पुढें असाच एक जोगी भेटला, आणि त्यानें शंख देऊन सदाशिवाची मूर्तिहि दिली व त्याची पूजा करावयास सांगितली. आणि बनारसी अष्टविध पूजा करूं लागला व अष्टोत्तर जप करूं लागला. पूजा केल्याशिवाय बनारसी भोजन करीत नसे. जैन असूनहि आणि स्वतः विचार करणारा असतांनाहि, भोळ्या लोकांना मूर्ख म्हणत म्हणत, स्वतः बनारसीहि असल्या खेळांतून सुटला नाहीं. पुढें बनारसी काशीस गेला असतांना पार्श्वनाथाची पूजा करीत असतांनाहि ह्या शंखमहेशांची पूजा करण्यास विसरला नाहीं. पण पुढें त्याच्या भ्रमाचा भोपळा फुटला.

कारण तो म्हणतो,

सोरठा

"संखरूप सिवदेव, महासंख बानारसी
दोऊ मिले अबेव, साहिब सेवक एकसे."

तो एक शंख तर आपण महाशंख. तेव्हां धनी-चाकरांमध्यें सहजच अभेद झाला. पण ही अक्कल बनारसीला मागाहून सुचली!

## छत्रपति अकबराचा मृत्यु

मध्यंतरीं, सलीम म्हणजे जहांगिर, याचा जव्हेरी हिरानंद ओस्वाल हा प्रयागहून जैनसंघ घेऊन संमदशिखराला गेला. त्याच्याबरोबर खरगसेनहि गेला. मग बनारसी आईशीं भांडून भांडून यात्रेच्या निमित्तानें काशीस गेला. खरगसेन यात्रेहून परत आला. यात्रेंत त्याला फार त्रास झाला. इतक्यांत सं. १६६२ आला आणि "छत्रपति अकबर-साहि जलाल, नगर आगरै कीनौं काल." याप्रमाणें अकबराचा अंत झाला. येथें बनारसीनें अकबराच्या मागें 'छत्रपति' असें विशेषण लाविलें आहे, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. पूर्वी एका प्रसंगीं 'वसुधा-पुरहूत' म्हणजे पृथ्वीचा इंद्र, असें विशेषण बनारसीनें अकबरास लाविलें आहे. अकबराच्या मृत्यूची वार्ता जौनपुरास आली, तेव्हां

"प्रजा अनाथ भई बिनुनाह
पुरजन लोग भए भयभीत
हिरदै व्याकुलता मुख पीत."

लोक घाबरले. त्यांचे चेहेरे उतरले. आणि खुद्द बनारसी,

"सीढ़ी परि बैठयौ हुतौ,
भयौ भरमचित चाल
आइ तवाला (मूर्च्छा) गिरि पर्यौ,
सक्यौ न आपा राखि
फूटि भाल लोहू चल्यौ,
कह्यौ 'देव' मुखभाखि
लागी चोट पखानकी,
भयौ गृहांगन लाल
हाइ हाइ सब करि उठे
मात तात बेहाल."

अकबराच्या मृत्यूची वार्ता आली, त्यावेळेस बनारसी शिडीवर अथवा जिन्यावर बसला होता. तो ती बातमी ऐकतांच मूर्च्छा येऊन खालीं पडला. त्याला खोक पडली आणि त्यांतून भळभळा रक्त वाहूं लागलें. इकडे गांवांत दहा दिवसपर्यंत मोठीच गडबड उडून गेली,

"घरघर दरदर दिए कपाट
हटवानी नहिं बैठें हाट"

बाजार बंद झाले. लोकांनीं घरें लावून घेतलीं आणि लोक उंची पोषाख करून हातांत शस्त्रें घेऊन तयार झाले. अशी धामधूम दहा दिवस-पर्यंत चालली. बावन्न वर्षें पातशाही केलेला अकबर मेल्यावर कशी गडबड उडाली व अकबर किती लोकप्रिय होता याचा स्पष्ट पुरावा ह्या जैन कवीच्या निरपेक्ष वर्णनांत आपणांस सांपडतो. मग जहां-गीरची द्वाही फिरली आणि सर्व स्थिरस्थावर झालें. बनारसीनें तो दिवस उत्सवांत घालविला.



अणुक्रमणिका

## बनारसी आपली कविता गोमतींत बुडवितो

नंतर एक दिवस बनारसी असा विचार करीत बसला असतांना आपण शिव-पूजा निरर्थक करीत होतों असें त्यांस वाटूं लागलें. मग त्यानें शिव-पूजा सोडली. तो शंख घेऊन आपल्या मित्रां-बरोबर गोमती नदीच्या पुलावर आला आणि बरोबर त्यानें आपला नवीन तयार केलेला ग्रंथहि घेतला होता. हा ग्रंथ त्यानें देवदत्त आणि भानचंद यांच्यापाशीं अध्ययन करीत असतांनाच म्हणजे सं. १६५७ मध्यें रचला होता. लक्षांत घेण्यासारखी गोष्ट अशी कीं, यावेळीं कवीचें वय अवघें चौदा वर्षांचें होतें. त्याकाळीं मुलांचीं लग्नेंच लहानपणीं होत असत असें नाहीं तर तीं अनेक प्रौढपणाचीं कामें लहान वयांतच करूं लागत असत. शेंकडों उदाहरणांवरून हें सिद्ध होतें. लहान वयांतच आपल्या घराण्याच्या व्यवहारांत मुलें भाग घेऊं लागत, हें अगदीं स्पष्ट आहे. ज्ञानेश्वर किंवा शंकरा-चार्य यांच्यासारख्यानें आपली ग्रंथरचना वयाच्या ज्या अवस्थेंत केल्याचें मानण्यांत येतें त्याबद्दल शंकित होणारांनीं, बनारसीचा हा पक्क्या कालनिर्णयानें युक्त असा पुरावा डावलून चालणार नाहीं. एवढाच एक पुरावा ह्या अर्ध–कथानकापासून मिळता, तरी तेवढ्या प्रमाणासाठींहि या ग्रंथाचें विशेष महत्त्व आपणांस मान्य करावें लागलें असतें. आमच्या मतें ह्या पुराव्याची मात-ब्बरी इतकी मोठी आहे. वयाच्या चौदाव्या वर्षी बनारसी मोठमोठ्या ग्रंथांचें अध्ययन करीत होता हें मागें सांगितलेंच आहे. त्याची आसिखीहि त्याच वेळीं चालू होती. आणि त्याच वेळीं तो म्हणतो,

" पोथी एक बनाई नइ,<br>
मित हजार दोहा चौपइ<br>
तामइ नवरसरचना लिखी,<br>
पइ बिसेस बरनन आसिखी. " ॥ १७८॥

म्हणजे कवीनें ह्यावेळीं एक नवा ग्रंथ केला आणि दोहा व चौपइ छंदांत त्यानें एक हजार छंदांची रचना केली. ह्या हजार छंदांत त्यानें नवरसांचें वर्णन केलें होतें. पण त्यांतल्या त्यांत इष्कबाजीचें वर्णन अधिक होतें, असें तो सांगतो. एक हजार छंदांचा ग्रंथ म्हणजे लहान सहान ग्रंथ नाहीं. इतके छंद बनारसीनें लीलेनें रचिले, यावरून त्याची काव्यशक्ति किती जबर होती याची कल्पना येते. त्याची इतर रचना पाहतां त्याचे हे छंदहि मनोरम असतील, याबद्दल शंका वाटत नाहीं. पण पुढें बनारसीचें मन पालटलें. शंखपूजेच्या मूर्खपणाचा विचार करतां करतां त्याच्या मनाला पश्चात्ताप झाला आणि गोमतीच्या पुलावर तो आपला ग्रंथ उघडून,

" बांचै सब पोथीके बोल,<br>
तब मनमैं यह उठी कलोल,<br>
एक झुट जो बोलै कोइ,<br>
नरक जाइ दुख देखै सोइ,<br>
मैं तो कलपित बचन अनेक,<br>
कहे झूठ सब साचुन एक ॥ २६६ ॥<br>
कैसे बनै हमारी बात,<br>
भई बुद्धि यह आकसमात<br>
यहु कहि देखन लाग्यौ नदी,<br>
पोथी डार दई ज्यौं रदी,<br>
हाइ हाइ करि बोले मीत,<br>
नदी अथाह महाभयभीत,<br>
तामैं फैलि गए सब पत्र,<br>
फिरि कहु कौन करै एकत्र ॥ २६८ ॥

याप्रमाणें पश्चात्तापाच्या भरांत बनारसीनें आपल्या नवरसग्रंथाचीं सर्व पानें, गोमतीच्या महा-प्रवाहांत रद्दीप्रमाणें फेकून दिलीं. बनारसीच्या मनाची या वेळीं कशी कालवाकालव झाली असेल, त्याचें चित्र वरील त्याच्या चौपय्यामध्यें आपणांस प्रतिबिंबित झाल्याचें पहावयास सांपडतें. प्रसंग किती काव्यात्मक आहे! एकोणीस वर्षांचा एक तरुण पश्चात्तापानें दग्ध होऊन चौदाव्या वर्षी केलेली आपली काव्यरचना स्वतःच्या हातानें गोमती नदीला समर्पण करीत आहे. तुकारामबुवांनीं आपल्या काव्याच्या वह्या इंद्रायणींत बुडविल्या. पण त्या दुसऱ्यांच्या छळानें. विद्यमान कवींच्यापैकीं सुप्रसिद्ध स्वामी कुवलयानंद यांनीं आपल्या हजारों कविता स्वतःच्या हातानें जाळून टाकल्याचें नमूद केलें आहे. तथापि बनारसीची ही कृति निःसंशय अपूर्व ठरेल. आपण भलतीच काव्यरचना केली, खोटें आणि बोखटें बोल बोललों, याचा कवीला पश्चात्ताप होऊन तो म्हणतो, " ऐसे कुकवी बनारसी



अणुक्रमणिका

भए मिथ्या ग्रंथ बनाये नए." आपण कुकवि झालों असें कदाचित् अतिशृंगारिक कविता केल्यावरून त्याला वाटलें असेल. पण आपण झूट किंवा कल्पित कांहीं लिहिलें असें जेव्हां तो म्हणतो, तेव्हां त्याच्या म्हणण्याचा नक्की आशय ध्यानांत येत नाहीं. अभिसारिकांची वगैरे वर्णनें त्यानें केलीं असल्यास न कळे. कवीनें नष्ट केलेला हा ग्रंथ अर्थातच नष्ट झाला असें समजलें पाहिजे. कारण गोमतींत वाहून गेलेलीं तीं पानें कोणी एकत्रित केलीं असतील, आणि तीं कधीं उपलब्ध होतील, तर तो एक चमत्कारच म्हटला पाहिजे.

सामाजिक दृष्टीनें ह्या घटनेच्या योगानें तत्कालीन समाजाची जी थोडीशी कल्पना आपणांस बांधतां येते त्यावरून, सैलपणा आणि शिथिलपणा समाजांत कसा शिरला होता, याबद्दल अधिक विवेचन करण्याची गरज नाहीं. येथें दोन लहान मुद्यांचा विचार नमूद करून ठेवूं. कवि ह्या प्रसंगांत आपण गोमतीच्या पुलावर होतों असें लिहितो. गोमतीसारख्या मोठ्या प्रवाहाच्या नदीवर त्यावेळीं असलेला पूल हा नांवाचाच पूल असावा असें वाटतें. तसेंच, पोथी आपण रद्दीप्रमाणें फेकून दिली असा दृष्टांत कवि देतो, यावरून घरांतील जुने कागद अथवा रद्दी नदी, तलाव वगैरेसारख्या जलाशयांत सोडून देण्याची जुनी वाहिवाट ध्यानांत येते. असो. याप्रमाणें हा प्रसंग संपला आणि—

" घड़ी द्वैक पछतानें मित्र,
कहैं कर्मकी चाल विचित्र
यहु कहिकैं सब न्यारे भए.
बनारसी अपनें घर गये. "

याप्रमाणें हा अंत्य-संस्कार करून कर्मगति विचित्र आहे असें म्हणत म्हणत मित्रमंडळी घरोघर गेली.

---

## माझ्या क्रियात्मक जीवनाचें तात्त्विक अधिष्ठान

पान ११ वरून ]

झाली, तरी आपण नाउमेद होत नाहीं, निराश होत नाहीं. कारण समाजाच्या प्रत्येक घटकाच्या अंतर्यामीं उपद्रष्टा म्हणून जो उपस्थित आहे आणि जो सर्वांचा महेश्वर आहे, त्यानें आपल्या अंतर्यामांतून आपणाला बरें म्हटलेलें आहे.

माझ्या क्रियात्मक जीवनाचा तपशील १९०२ पासून १९१३ पर्यंतचा थोडासा वर दिला आहे. त्यांत भर घालावी किंवा १९१३ नंतरच्या खटपटी येथें द्याव्या, असें मला वाटत नाहीं. माझ्या खटपटींची, माझ्या कष्टांची तात्त्विक बैठक काय होती व काय आहे हें मी विशद करण्याचा प्रयत्न केला आहे, तेवढा पुरें आहे, असें मला वाटतें. शेवटीं सेवेचे कष्ट करणारे व करूं इच्छिणारे यांना मी पुनः पुन्हा हेंच सांगेन कीं,

करा कष्ट परी नष्ट व्हायाचें दुष्ट जाणुनी
कष्टें करा हरी तुष्ट आत्मभ्रष्ट न व्हा कुणी
आत्मा तो प्रेम जें शुद्ध पदार्थ झिजवीतसे
देहा मना आपुलिया; महाशांति तिथें वसे ॥

---

# संस्कृति व विकास

प्रा. श्री. व्यं. पुणतांबेकर नागपूर युनिव्हर्सिटी

संस्कृति ही निरंतर बदलणारी व सदैव विकासी आहे, का तिचें एक स्थायी व निश्चित स्वरूप आहे, का तिचीं अनेक स्थायी व निश्चित स्वरूपें आहेत, अशीं तीन प्रकारचीं मतें आज प्रचलित आहेत. पहिलें मत परिस्थितीला महत्त्व देतें. दुसरें मानवी मूल्यांना महत्त्व देतें. तिसरें मानव व परिस्थिति यांच्या संपर्काला व सापेक्षतेला महत्त्व देतें. पहिलें मत संस्कृतीच्या विकासाचा एकच रोख अथवा मार्ग मानतें. तोच मार्ग त्याला आवश्यक, इष्ट व अनिवार्य असा दिसतो. या मताप्रमाणें भौगोलिक व आर्थिक परिस्थितीच्या प्रभावानें अथवा प्रेरणेनें तो मार्ग मानवांना सुचतो व त्याला धरून त्यांना जावें लागतें असें मानतात. त्याप्रमाणें जे जात नाहींत किंवा त्यामध्यें जे परिवर्तन करूं इच्छितात अथवा तसा प्रयत्न करतात, ते मानव-संस्कृतीचे शत्रु असून तिला ते अनिष्ट वळणावर नेणारे आहेत असें मानतात. याकरितां त्यांचा व त्यांच्या प्रयोगाचा नाश करणें हें आपलें कर्तव्य आहे, असें ते समजतात. अशा प्रकारचीं मतें विशेषतः समाजवादी लोकांमध्यें सांपडतात व अंशतः ख्रिस्ती व मुसलमान धर्मीयांमध्यें दिसून येतात. मात्र हे धर्मीय परिस्थितीला महत्त्व न देतां एका प्रवर्तक मताला व एका विशिष्ट मार्गाला महत्त्व देतात,

दुसऱ्या मताचे लोक मानवी संस्कृतीचीं शाश्वत मूल्यें व स्थायी प्रकार कल्पून परिस्थितीला न जुमानतां त्यांचें समर्थन करतात. ते विकासतत्त्व अथवा प्रगतितत्त्व मुळींच मानीत नाहींत. त्यांच्या मतें संस्कृतीचें खरें स्वरूप एकच आहे व तें त्यांनाच समजलें आहे. तें राखणें व पटविणें हेंच त्यांच्या प्रवर्तकाचें कर्तव्य आहे. तें परिस्थितीला पोषक व अनुकूल नसलें तर ती परिस्थितिच बिघडली आहे, ती युगाचा परिणाम अथवा प्रभाव आहे, असें मानतात. पण परिस्थितीला अनुसरून संस्कृतीमध्यें बदल करणें हें चुकीचें व घातक आहे, असें मत विशिष्ट धर्मवादी अथवा पंथाचें असतें. त्यामध्यें मानवी विविध क्रियेला, स्वतंत्रतेला व शक्तीला जागा नाहीं. कांहीं अद्भुत शक्तींनीं किंवा दैवी शक्तींनीं खऱ्या संस्कृतीचीं मूल्यें, आचार व विचार ठरविलेले आहेत. त्यामध्यें बदल करणें अथवा कल्पिणें हें गर्ह्य व त्याज्य आहे, असें ते समजतात. परिस्थितीला महत्त्व देणें अथवा तिला अनुसरून वागणें हें त्यांना मान्य नाहीं.

## प्रभावी घटक

तिसरें संस्कृतीबद्दलचें मत मानव व परिस्थिति ह्या दोन्ही घटकांना प्रेरक व प्रभावी समजतें. त्यांच्या परस्पर संयोगानें अथवा संघर्षानें संस्कृतीचीं स्थलकालात्मक अनेक रूपें उत्पन्न होतात व तीं कांहीं काल टिकून लय पावतात, असें आजच्या इतिहासज्ञांचें, समाजशास्त्रज्ञांचें, भूगोलज्ञांचें मत आहे. तेंच मत अधिक ग्राह्य वाटतें. त्यामध्यें मानवाचें कर्तृत्व, परिस्थितीची आवश्यकता व आकस्मिक घटनांचा प्रभाव या सर्वांचा मेळ व कार्यकारणभाव ओळखलेला असतो. केवळ एका घटकाला व एका मार्गाला प्राधान्य दिलेलें नसतें.

## मनुष्यच मनुष्याचा शत्रु !

कोणत्याहि ऐतिहासिक घटनेचें व संस्कृतीचें खरें स्वरूप समजून घ्यावयाचें असेल तर वरील तिन्ही घटकांचें विश्लेषण व विचार केला पाहिजे. तेव्हांच मानवी जीवनाचें खरें स्वरूप समजेल. हें तिसरें मत मानवी व सांस्कृतिक विकासाचा एकच मार्ग अथवा संस्कृतीचें एकच स्वरूप मानीत नाहीं. विकास हा त्याच्या दृष्टीनें एकच प्रकारचा व विशिष्ट मार्गानें अव्याहत जाणारा नाहीं. त्याला अनेक रूपें आहेत व तीं स्थिर स्वरूपाचीं नाहींत. मानवी जीवन व त्याचीं रूपें अनेक व अनंत आहेत. तीं इतिहासाच्या एकाच चाकोरींत बसणारीं नाहींत. त्यांच्या विविधतेमध्यें मानवी जीवन नित्य विकसित व प्रफुल्लित होत असतें. मानवी जीवनाच्या एकाच प्रकाराला व एकाच मार्गाला श्रेष्ठ कल्पून त्याला एका दावणींत बांधणारीं व दोरींत घालणारीं मानवी संस्कृतीबद्दलचीं मतें आज फार बोकाळलीं आहेत. त्यामुळें समाजामध्यें आदर व प्रेम, करुणा व मैत्री न राहून मनुष्य हा मनुष्याचा, समूह हा समूहाचा, संस्कृति ही संस्कृतीची शत्रु होऊन बसलीं आहेत. त्यामुळें आंतरराष्ट्रीय, आंतरजातीय, आंतरधर्मीय कलह वाढला आहे. व जगांमध्यें आज संहाराच्या कल्पना वाढत आहेत.

## व्यापक दृष्टीची आवश्यकता

जगाला आज उदारत्वाची व उदारमतवाद्यांची, त्यांच्या व्यापक बुद्धीची, त्यांच्या मानवी भावनेची, त्यांच्या बंधुत्वाच्या कल्पनेची फार जरूरी आहे. मानव समाज हळूं हळूं मानवी वळणावर एका व्यापक स्वरूपाकडे जात असेल व जाईलहि. पण त्याला अवधि आहे. मानवाच्या आंतरिक व आध्यात्मिक शक्तीचा अजून बराच विकास व्हावयाचा आहे. तद्वत् त्याचे निसर्गाबद्दलचे शोध व ज्ञान पूर्ण व्हावयाचें आहे. त्या दोघांचा मेळ बसावयाचा आहे. त्यांचीं मूल्यें ठरावयाचीं आहेत. त्यांतील तारतम्य अनुभवानें अजमावयाचें आहे. तोंपर्यंत तिसरें उदार मत हेंच संस्कृतीबद्दलचें उपयोगी व खरें मत धरून आज मानवसमाजाला आपले व्यवहार व संबंध आंखले पाहिजेत. या मतामध्यें संस्कृतीच्या अनेकविध विकासाला व संपर्काला जागा आहे. त्यामध्यें भिन्न संस्कृतींचा केवळ विरोधच असतो, त्यामध्यें देवघेव मुळींच नसते अशा कल्पना नाहींत. संस्कृति–संस्कृतीमध्यें कांहीं भिन्नता असली तरी कांहीं साम्य असतें. त्यांच्या परस्पर संपर्कानें नवीं मूल्यें, नवी नीति, नवे विचार उत्पन्न होऊं शकतात. अशा ह्या मानवी संस्कृतीच्या विकासाला तिसरें उदार मत फारच अनुकूल व प्रेरक आहे. त्यांची दृष्टि ही खरी मानवी ऐतिहासिक दृष्टि आहे. दुसरीं मतें दुरभिमानी व दुराग्रही आहेत. त्यांच्यामध्यें संकुचितपणा असून दूरदृष्टि व खऱ्या मानवतेची ओळख नाहीं. ही दृष्टि येण्यास इतिहासाचा व मानवी समाजांचा व्यापक अभ्यास पाहिजे. अशी दृष्टि आध्यात्मिक योगाभ्यासानें येऊं शकते. आमच्या साधुसंतांना ज्ञानेश्वर–तुकारामांना ही दृष्टि होती. त्यांची मानवसमाजाची व संस्कृतीची व्यापक कल्पना आणि मानवाच्या विविधतेची व अध्यात्माची पूर्ण जाणीव त्यांना फार उपयोगी पडली. आजचे विचारी तत्त्वज्ञ, समाजशास्त्रज्ञ व इतिहासकार याच मताकडे वळत आहेत.

## विकासाचा अर्थ

आतां हा विकास कोणत्या प्रकारें होतो, त्याची गति एकाच दिशेनें सरळ रेषेप्रमाणें व सदैव इष्ट धोरणानें असते काय ? अथवा ती गति मागेपुढें हेलकावे खात होत असते कां नागमोडीच्या गतीनें पुढें जाते, कां ती गति केवळ वर्तुळाकार असून त्यामध्यें उत्पत्ति, स्थिति, गति व लय या अवस्था युगधर्माप्रमाणें वारंवार पुन्हा पुन्हा येत असतात ?

कोणतीहि विकासाची किंवा विस्ताराची, गतीची किंवा प्रगतीची गोष्ट घेतली, तरी त्याला एक विशिष्ट मार्ग व विशिष्ट अवस्था कल्पिलेल्या असतात. अशा कल्पना बऱ्याचशा आधुनिक इतिहासकारांना अथवा समाजशास्त्रज्ञांना नाहींत. त्यांच्या मतें मानवी जीवनामध्यें विकास व विस्तार आहे, क्रान्ति व उत्क्रान्ति आहे, प्रगति व पिछेहाट आहे, संकोच व वृद्धि आहे. पण हीं सर्व एकाच ठराविक मार्गानें, एकाच निश्चित स्वरूपानें व एकाच आवश्यक गतीनें जाणारीं नाहींत. मानव, परिस्थिति व अज्ञात शक्ति यांच्या संयोगानें, संपर्कानें अथवा संघर्षानें मानवी आचारविचार, व्यवहार व



अणुक्रमणिका

संस्था, जाति व समूह, वर्ग व वर्ण, यांना अनेक रूपें प्राप्त होतात. तीं सर्व त्या त्या काळीं व स्थळीं स्वाभाविक असून त्यांना एका विचारधारेंत व वादभूमिकेंत गोंवण्याची आवश्यकता नाहीं. जगाच्या अंतापर्यंत मानव जर स्वतंत्र राहिला व त्याची शक्ति टिकली तर तीं रूपें व त्याचे आविष्कार अनंत होतील. हेंच विविधत्व व विस्तारित्व मानवी संस्कृतीचें खरें स्वरूप आहे व त्याच्या विकासाचा खरा अर्थ आहे.

## संस्कृति-उपासकाचें कर्तव्य

जगाच्या सर्व उच्च व विविध कल्पनांचा व रूपांचा, त्यांच्या मूल्यांचा व ज्ञानांचा मक्ता एका विशिष्ट ऐतिहासिक व्यक्तीला देऊं पाहणें म्हणजे मानवी संस्कृतीचा, तिच्या विकासाचा व मानवाच्या शक्तीचा खून करण्यासारखें आहे. असे प्रयत्न कांहीं विशिष्ट धर्मीय आपल्या पंथाला धर्म मानून व कांहीं विशिष्ट तत्त्वज्ञ आपल्या वादाला तत्त्व मानून आजपर्यंत करीत आले आहेत.

त्यांची दृष्टि किती कोता, अंध व असहिष्णु आहे हें सांगणें नकोच. संस्कृतीला अशा मतवाद्यांच्या व धर्मवाद्यांच्या पोलादी चौकटींतून सोडवून घेणें हेंच कर्तव्य आजच्या खऱ्या उपासकांचें आहे. तेव्हांच खऱ्या संस्कृतीचा उदय होईल व त्या विकास पावतील.

## संस्कृतिविकासाचा खरा मार्ग

खरी संस्कृति बहुविध असते. तिच्या अनंत शाखा असतात. तिला अनंत मुळें असतात. तिचीं फळें, फुलें व पल्लवहि अनंत असतात. तिच्या बुडाशीं मानवी स्वातंत्र्याचें, मानवाच्या अनेकविध, बहुगामी, अनंत व अगाध शक्तींचें प्रेरक बल स्वयंभू आणि स्वसंपादित असतें. अशा संस्कृतीच्या संपादनाला व संरक्षणाला, तिच्या संवर्धनाला व उपभोगाला व्यक्तिस्वातंत्र्य, समूहस्वातंत्र्य व निष्ठा स्वातंत्र्य पाहिजे. त्यावांचून त्याची जोपासना व आविष्कार, वाढ व विकास होणें शक्य नाहीं. अनेकविध कल्पनांच्या व तत्त्वांच्या संपर्कानें व संघर्षानें उच्च संस्कृतीचें खरें स्वरूप उदयास येऊं लागतें. त्यांच्या इतिहासांत सांठविलेल्या अनुभवानें व प्रत्यंतरानें त्यांचें मूल्य व नीति समजते. तेव्हां संस्कृतीबद्दलचें तिसरें मतच या दृष्टीनें व या अनुभवामुळें अधिक ग्राह्य ठरतें. उदारमतवाद हाच संस्कृतीच्या उत्पत्तीचा व विकासाचा खरा पाया व मार्ग आहे. दुसरीं मतें संस्कृतीच्या व्यापक विकासाचें दार व मार्ग बंद करतात, व मानवी समाजाला दास्याच्या एका कोंडवाड्यांत कोंडूं पाहतात. त्यांचे एकांगी व आभिनिविष्ट संकुचित मार्ग, त्यांची अतिरेकी व हिंसक वृत्ति हीं सर्व संस्कृतीला व तिच्या विकासाला मारक झालीं आहेत, असें कोणत्याहि देशाचा इतिहास आपणांस सांगेल.

जगाच्या ज्ञानाची वाढ व मानवाच्या इच्छांचें समाधान ह्या एकांगी धर्मांचा, वादांचा व वृत्तींचा विरोध करण्यानेंच झालें आहे. हिंदूंचा इतिहास, ग्रीकांचा इतिहास, चीनचा इतिहास युरोपमधील पुनरुज्जीवन व सुधारणा, बुद्धिवाद व उदारमतवाद यांचा इतिहास हेंच सांगतो. युरोपमधील भौतिक शास्त्रांच्या वाढीचा व उत्कर्षाचा इतिहास त्याचीच जाणीव करून देतो.

आज संस्कृतीचें चढतें-वाढतें स्वरूप जर टिकलें असेल व तिचा विकास जर चढता-वाढता झाला असेल तर त्याच्या मार्गें असलेली व्यक्तिस्वातंत्र्याची, उदारमताची, आदरबुद्धीची व सर्वसंग्राहक आणि सर्वपोषक वृत्तीच होय. फरक पडण्यानेंच विकास व वाढ होते, व्यापकता व विस्तृतता येते. केवळ एकतंत्रीपणानें निसर्गाच्या व मानवाच्या अद्भुत, अनंत व अगाध शक्ति जागृत होत नाहींत; व त्यांचीं नानारूपें व विविध सौंदर्य दृष्टीस पडत नाहींत. जग हें अनंत आहे, तसेंच त्याचीं रूपें, त्यांतील विद्या, त्यांतील कला अनंत आहेत. तेव्हां संस्कृति व विकास यांतील मुख्य दुवा व्यक्तिस्वातंत्र्य व उदारमतवाद हींच होत.

———

# गुन्हेगार हे समाजाचे शत्रु आहेत कां ?

श्री. शं. शां. मोरे बी. ए., एल्एल्. बी.

Crimes, it is well-known now, is not the result of an original sin in a criminal but is much more a product of his environment and his lack of opportunity and training. In a sense society is to blame for producing the criminal. It is time, there fore, that society sought to understand this question and to deal with it scientifically. A proper social environment and structure should, in fact almost eliminate the criminial off, at any rate should reduce his number greatly.

Jawaharlal Nehru.

ता. १५।८।४७ रोजीं हा देश स्वतंत्र होऊन या देशाचें फार वर्षांचें पारतंत्र्य संपलें. या दिवशीं ब्रिटिशांनीं आमच्या हातांत सर्व सत्ता परत दिली. देशाच्या इतिहासांतील अपूर्व अशा आनंदाचा हा प्रसंग देशांतील लहानथोर अशा सर्व जातींच्या व धर्मांच्या मंडळींनीं अतिशय उत्साहानें साजरा केला. हा दिवस साजरा करतांना मुंबई सरकारनें, इतर प्रांतिक सरकारचें अनुकरण करून, सुमारें ३००० कैदी निरनिराळ्या कारागृहांतून मोकळे केले. देशाच्या हातांतील गुलामगिरीच्या बेड्या तुटून पडत असतांना बंदिवानांच्या हातापायांतील बेड्या काढण्यांत एकप्रकारचें औचित्य नाहीं का ?

## सुटलेल्या कैद्यांचा स्वातंत्र्योत्सव !

ता. १५ ला कदी तुरुंगांतून बाहेर पडतांच त्यांपैकीं कांहींनीं आपल्या पूर्वीच्या धंद्याला सुरुवात केली. ता. १६ पासूनच्या वर्तमानपत्रांत ठिकठिकाणचे स्वातंत्र्योत्सव कसे झाले, याच्या बातम्या येऊं लागल्या. त्याचबरोबर स्वतंत्र झालेल्या कैद्यांनीं आपलें स्वातंत्र्य कोणती तरी चोरी अगर घरफोडी करून साजरें केल याच्याही बातम्या येऊं लागल्या. या दोन्ही प्रकारच्या स्वातंत्र्य–दिन साजरा करण्यासंबंधींच्या वार्ता एकमेकांच्या मांडीला मांडी लावून वर्तमानपत्राच्या पाटावर बसलेल्या पाहून अनेक लोकांच्या मनांत भिन्नभिन्न विचार येणें साहजिक आहे. ज्यांची प्रत्यक्ष चोरी झाली त्यांना अगर त्यांच्या नातेवाईकांना सरकारनें कैदी सोडले या गोष्टींची चीड येणें मनुष्य–स्वभावाला धरूनच आहे. ज्यांना प्रत्यक्ष अशी झळ लागली नाहीं तीं माणसेंही " सरकारनें कैदी सोडले तें बरें केलें नाहीं " असेंही एकमेकाला कांहींसा गंभीर चेहरा करून सांगत आहेत. याच्या उलट चोरी अगर घरफोडीची बातमी ऐकून आनंद मानणारीही कांहीं मंडळी आहेत. ज्यानें कांहीं वित्त जमविलें आहे, त्याच्याच घराकडे चोर आपलीं पावलें वळवितो. साखरेकडे मुंगी, गुळाच्या ढेपेकडे मुंगळा, सावकाराकडे कर्ज घेऊं इच्छिणारे, विवाहास लायक असलेल्या मुलांच्या बापांकडे उपवर वधूंचे गरजू बाप व कांहीं कोर्टकचेरीच्या लफड्यांत सांपडलेल्या पक्षकारांकडे कोर्टांतील कज्जे–दलाल ज्याप्रमाणें जातात, त्याचप्रमाणें चोर हेही, ज्यांच्या घरांत चोरण्यासारखें कांहीं आहे, त्यांच्याच घरांकडे आपली भेदक नजर वळवितात. ज्यांच्याजवळ अंगावरील वस्त्राशिवाय कांहीं नाहीं व उपासमारीशिवाय ज्यांना दिवस जात नाहीं अशा लोकांना पैसेवाल्यांच्या घरीं डाका पडला याबद्दल

दुःख कां व्हावें ? आपल्या कारखान्यांतील मजुरांना अर्धपोटी ठेवून ज्यांनीं पैसे कमविले आहेत, त्या कारखानदारांची तिजोरी कोणी फोडली तर त्याचा शोक मजुरांनीं कां करावा ? काळ्या बाजारांत पैसे मिळविणारांच्या घरची मोठी रोकड सफाईनें कोणी लांबविल्याची बातमी वाचून त्या व्यापाऱ्यांच्या नफेबाजीमुळें हैराण झालेल्या लोकांना मनांतल्या मनांत आनंद वाटल्यास व त्यांपैकीं कांहींनीं हा आनंद व्यक्त केल्यास आपण आश्चर्य कां मानावें ?

## हीं समाजाच्या अंगावरील बेंडें !

गांवांत कोठेंही चोरी, घरफोडी झाली कीं आनंदी अगर दुःखी होणाऱ्या लोकांच्या तांड्यापासून दूर होऊन आपण चोर दरोडेखोर यांच्या प्रश्नाकडे थोड्या निराळ्या दृष्टीनें पाहणें जरूर आहे. घरांत माशा फार झाल्या कीं एक एक माशी मारीत न बसतां आपण "माशा एवढ्या कां झाल्या" या प्रश्नाचा विचार करूं लागतों. व घरांत कोठें कांहीं घाण असली तर ती नाहींशी करून माशांचा उपद्रव कमी करण्याच्या तजविजीला लागतों. रात्रीं डांस डोक्याजवळ फारच गुणगुणूं लागले कीं आपण "डांस इतके कां झाले ?" असा प्रश्न पुढें करून, जवळपास कोठें जर घाण पाण्याचीं डबकीं झालीं असलीं, तर तीं नाहींशीं करण्याचें काम तांतडीनें हातांत घेतों. मुलाच्या अंगावर बेंडें फार येऊं लागलीं कीं आपण "कोणत्या कारणामुळें हीं बेंडें येत आहेत ?" हा प्रश्न वैद्याला विचारतों व तें कारण नष्ट करण्यासाठीं उपाय--योजना करूं लागतों. चोरी झाली, घरफोडी झाली, दरोडा पडला कीं "चोराला अगर दरोडेखोराला पकडा व त्यास शासन करा" अशी आरोळी ठोकून हा प्रश्न सुटणार नाहीं. चोराला धरून त्याला कितीही कडक शासन केलें तरी चोराचा वर्ग नष्ट होणार नाहीं. इंग्लंडमध्यें एकाकाळीं चोरीच्या गुन्ह्याला देहान्ताची शिक्षा होती. पण या शिक्षेची दहशत बसून चोरी करणारे निर्माण होण्याचें बंद पडलें नाहीं. आम्ही या गुन्हेगार वर्गाकडे शास्त्रीय नजरेनें पाहून, तो गुन्ह्याला कां प्रवृत्त होतो, याचीं कारणें शोधून काढलीं पाहिजेत व तीं कारणें दूर केलीं पाहिजेत.

समाजशास्त्राचा व विशेषतः गुन्हेगारांच्या मानसशास्त्राचा अभ्यास करणाऱ्या पाश्चिमात्य तज्ज्ञांनीं या प्रश्नाचा सांगोपांग विचार करून "मनुष्य गुन्ह्याला कां प्रवृत्त होतो" याचीं अनेक कारणें दिलीं आहेत. आपल्या या देशांतही आतां कांहीं विद्वान मंडळी या प्रश्नाची चिकित्सा करूं लागली आहेत. कोणत्या कारणांमुळें मनुष्य गुन्हा करूं लागतो तें आपण पाहिल्यावांचून, गुन्हेगार समाजाचा शत्रु आहे किंवा नाहीं, या प्रश्नाचें उत्तर आपणांस देतां येणार नाहीं.

## गुन्ह्याची व्याप्ति वाढली

या गुन्हेगारीच्या मुळाशीं असलेल्या कारणांची चर्चा करण्यापूर्वीं "गुन्हा" या शब्दाचा आपण कोणत्या अर्थानें येथें उपयोग करीत आहोंत हें स्पष्ट करणें जरूर आहे. या शब्दाची व्याप्ति निश्चित न करतां आपण कारणांची उठाठेव केली तर त्या चर्चेमुळें विशेष बोध आपणांस होणार नाहीं.

"गुन्हा" या शब्दाचें क्षेत्र अलीकडे सारखें वाढत आहे. १९३९ सालीं लढाई सुरूं होण्यापूर्वीं जीं कृत्यें अगर जी वागणूक गुन्ह्यांच्या सदरांत पडत नव्हती, तीं कृत्यें अगर ती वागणूक आतां 'गुन्हा' या नांवानें ओळखलीं जाऊं लागलीं आहेत. लढाई सुरूं होतांच डिफेन्स ऑफ इन्डिया ॲक्ट व रूल्स अमलांत आले आणि त्यांच्याखालीं सरकारनें अनेक हुकूम काढून "गुन्हा" या शब्दाची व्याप्ति बरीच वाढविली. पूर्वीं माझ्या घरांत धान्याचीं पोतीं कितीहि दिसलीं तरी त्याबद्दल मला सरकार जबाब विचारूं शकत नसे. उलट माझ्या सांपत्तिक सुस्थितीचा तो पुरावा होता व त्यामुळें मला समाजांत प्रतिष्ठा प्राप्त होत असे. पण आज माझ्या घरांत रेशनिंगच्या कायद्याला मंजूर असलेल्या धान्यापेक्षां अधिक धान्य निघालें कीं तावडतोब सरकारी अधिकारी "तुम्ही गुन्हा केला" असा माझ्यावर आरोप करूं लागतात. पूर्वीं लोकांना मेजवान्या देणें हें आपलें संपन्न स्थितीचें प्रधान कर्तव्य धनिक मानीत असत. सहस्र भोजनें घालणें हा एक धर्मानें आदेशिलेला पुण्य मार्ग होता, पण

आज चोवीस लोकांपेक्षां अधिक लोकांना जेवावयास घालणें हा गुन्हा झाला आहे.

या लेखांत "गुन्हा" हा शब्द इतक्या सैल अर्थानें वापरण्यांत आलेला नाहीं. पूर्वीच्या कायद्यानें अत्याचाराचें अगर फसवणुकीचें कृत्य हें गुन्ह्याच्या सदरांत पडत असे. त्याचप्रमाणें व्यक्तींचें शरीर अगर मिळकत याविरुद्ध आगळीक करणें, हेंही गुन्ह्याच्या सदरांत पडतें. व त्याच मर्यादित अर्थानें गुन्हा हा शब्द या लेखांत वापरला आहे. अलीकडे अनेक नियंत्रणें जन्माला आलीं आहेत. ह्या नियंत्रणांचा भंग करणारा आज "गुन्हेगार" असला तरी त्याचा या लेखांत विचार करण्याचें कारण नाहीं.

## गुन्हेगारीचें मूळ

दारिद्र्य हें एक गुन्हेगारीच्या वृत्तीस जन्म देणारें महत्त्वाचें कारण आहे. ज्या ज्या देशांत आर्थिक विषमता आहे, त्या त्या देशांत मूठभर श्रीमंत व असंख्य गरीब जन्माला येतात. उद्योगधंद्याची बैठक भांडवलशाहीच्या पायावर आधारलेली असल्यामुळें शक्य तितके कमी लोक कामावर लावून व त्यांना शक्य तितकें जास्त वेळ राबवून उत्पादनाचा खर्च कमी करण्याकडे भांडवलवाल्यांच्या प्रयत्नांचा सतत रोख असतो. या त्यांच्या प्रयत्नाला यश आलें कीं फायद्याचें प्रमाण वाढतें. त्यांच्या तिजोरींत याप्रमाणें जादा नफा पडला तरी त्यामुळेंच देशांत बेकारीचा बकासुर जन्माला येतो. मालकांच्या अगर त्यांच्या हस्तकांच्या मर्जीप्रमाणें न वागणाऱ्या मजुरालाही तडकाफडकी नोकरीवरून कमी करण्यांत येतें. याप्रमाणें बेकारांची संख्या सावकाराच्या तिजोरीप्रमाणें फुगत जाते. हा बेकार झालेला इसम कांहीं काळ प्रामाणिकपणें नोकरी मिळविण्याचा प्रयत्न करतो. कुरूप मुलीच्या कंगाल बापाला स्थळ आणि या बेकाराला नोकरी अनेक उंबरठे झिजवूनहि मिळत नाहीं. या नोकरीसंशोधनाच्या प्रयत्नांत जवळ कांहीं शिल्लक असेल तीही खर्चून जाते. नातेवाईक अशा गरजू माणसापासून दूर दूर पळूं लागतात व त्याची पत कमी कमी होत गेल्यामुळें बाहेरून मदत मिळण्याचे झरेही आटून जातात. मग या बेकाराच्या व त्याच्या कुटुंबाच्या उपासमारीला सुरुवात होते. उपासमारी सहन करण्याला निसर्गानेंच कांहीं मर्यादा घातल्या आहेत. त्याचप्रमाणें दुःख सहन करण्याच्या मनुष्याच्या शक्तीलाहि मर्यादा असतात. स्वतःचे हाल व त्यापेक्षांहि आपल्या मुलांबाळांचे डोळ्यांदेखत होणारे हाल पाहून, काम करण्याची इच्छा व तयारी असतांही बेकार राहणाऱ्या त्या गृहस्थाच्या अंतःकरणाचें काय होत असेल, याची कल्पनाच केलेली बरी ! कुटुंबासह स्वतःचा प्राण नष्ट करणें किंवा चोरी करणें हे दोनच मार्ग त्याला दिसतात. अनेक बेकार आत्महत्या करतात; पण असे लोक अपवादात्मकच ! मनुष्याच्या मनांत जगण्याची इच्छा फारच प्रबळपणें रुजलेली असल्यामुळें आत्महत्या करण्यास तयार होणाऱ्या लोकांपेक्षां शेंकडो पटीनें अधिक लोक चोरी, दरोडा या पैसे मिळविण्याच्या मार्गाकडे वळतात. चोरी करणें, दरोडा घालणें समाजाच्या दृष्टीनें "पाप" आहे. पण आर्थिक विषमतेवर जगणारा समाज गरिबांकडे निष्ठुरपणें पहात असतांना, त्या समाजाला काय वाटेल याचा गरिबानें तरी कां विचार करावा ? गरीबांना उपाशी ठेवून त्यांना चोरी करण्यास भाग पाडणारा आमचा समाज संभावितपणाचा डौल मिरवीत पुन्हां त्याच "गुन्हेगारांना" दोषी ठरवून छळण्यास तयार होतो.

## दारिद्र्यच मोहाला कारण !

दारिद्र्यामुळें गुन्हेगारीचा आणखी एका प्रकारें जन्म होत असतो. कांहीं लोक पूर्ण बेकार नसतात. त्यांना कांहीं तरी नोकरी-धंदा असतो. पण त्या नोकरीचा पगार फारच कमी असतो. गरीब मनुष्याच्या पोटीं मुलांची नेहमींच जादा पैदास होत असते. नोकरींत दर वर्षाला एक रुपया बढती होणाऱ्या माणसाचा पाळणा दर दीड वर्षाला नियमानें हालत असतो. या खाल्या तोंडाच्या वाढत्या संख्येला नोकरींत मिळणारा पगार किंवा तुटपुंज्या धंद्यांतील किफायत पुरणें अशक्य असते. अशा अडचणीच्या दुष्काळांत एखाद्या घरांतील माणसाच्या आजाराचा तेरावा महिना आला कीं आणखी हालांत भर पडते. याप्रमाणें आर्थिक अडचणीच्या कांचांत सांपडलेल्या



अणुक्रमणिका

नोकराला लांच द्यावी लागते किंवा मालकाच्या पैशाची अफरातफर करावी लागते. अनेक वेळ हे प्रकार लपले जातात. पण एखाद्या दिवशीं दुर्दैव त्याच्यावर घाला घालतें. आणि तो अपकृत्य करतांना पकडला जातो. मोठे अधिकारी मोठ्या प्रमाणावर लांचलुचपत करीत असतात. पण लांच–प्रतिबंधक खात्याला मोठे अधिकारी दिसत नाहींत. त्यांना हे फक्त लहान-सहान अधिकारीच दिसावेत अशीच चमत्कारिक रचना त्यांच्या डोळ्यांची केलेली असते. " लांच " म्हणून चांगली भारी किंमतीची मोटार एखाद्या चिकण्या बागायतदाराकडून घेणारा इरिगेशनचा इंजिनिअर डौलानें त्या मोटारींतून उघडपणें फिरतो; पण एखाद्या शेतकऱ्याकडून चार आण्यांची भाजी मोफत घेणारा पट्टेवाला पकडला जातो आणि त्याच्यावर खटला होऊन तो " गुन्हेगार " या सदरांत येऊन पडतो. लाखों रुपयांचा काळाबाजार करणारा मोठा व्यापारी अधिकाऱ्यांना मेजवान्या देऊन डामडौलानें प्रतिष्ठित म्हणून सर्वत्र मिरवतो आणि दोन पैशांची काड्याची पेटी तीन पैशाला विकली म्हणून डोक्यावर पानपट्टीचा खोका घेऊन फिरणारा फेरीवाला प्रतिबंधक खात्याकडून मोठ्या ' शिताफीनें ' पकडला जाऊन " गुन्हेगार " ठरतो.

## आर्थिक विषमतेवर धर्माचें पांघरूण !

दारिद्र्यामुळें गांजलेला कुटुंबाचा कर्ताच गुन्हेगारीला तयार होतो असें नाहीं. त्याच्या कुटुंबांतील प्रत्येक मोठ्या माणसाला, मुलाला आमचा समाज गुन्ह्याकडे प्रत्यहीं ढकलीत असतो. दरिद्री नोकराची बायकोही कोठेंतरी मोलमजुरी करीत असतेच. श्रीमंताच्या घरीं स्वयंपाकासाठीं किंवा भांडीं घासण्यासाठीं जाणारी बाई त्या श्रीमंतांच्या घरीं सर्वत्र दिसणाऱ्या सढळ वैभवानें मनांतल्या मनांत चुरून जाते. " श्रीमंतांचीं मुलें हात धुण्यासाठीं दूध-तूप वापरीत असतांना आपल्या मुलांना सणासुदिनालाही दूध-तूप दिसत नाहीं " या विचारानें तिच्या मनाला विषाद वाटतो. " श्रीमंतांच्या घरच्या कुत्र्यांना दररोज जो सोन्याचा घांस मिळतो तो आपल्या मुलांना दिवाळी–दसऱ्यालाही दिसत नाहीं " याबद्दल तिला खेद होतो. आपल्या मुलाबद्दलची कोमल वत्सलता व श्रीमंतांच्या घरचें निर्दय उधळपट्टी तिच्या मनांत " आपण यांतील कांहीं वस्तु घरी नेल्या तर " असा विचार पैदा करतात. प्रथम धर्माचें भय तिला परावृत्त करतें. श्रीमंतांचे तनसडीला उपाशी पोटीं राहणाऱ्या गरीबानें हात लावूं नये म्हणूनच श्रीमंतांचे पाठीराखेंपण करणाऱ्या भिक्षुकशाहीनें " चोरी करणें पाप आहे " असें गरीबांच्या कानींकपाळीं सांगण्याचा शेंकडों वर्षे प्रयत्न चालविला आहे. पण ही धर्माची शिकवणूक नेहमींच प्रभावी ठरते असें नाहीं. अनेक गरीब बाया मोहाला बळी पडतात. अनेक घरच्या दारिद्र्यामुळें चोरी करण्यास तयार होतात. कांहीं वेळ ही चोरी पचते पण एखाद्या दिवशीं केलेलें हें कृत्य उघडकीस येतें आणि " चोरटी मेली " असें किंचाळत मालकीण तिला पोलिसाच्या स्वाधीन करते. " गुन्हेगार " हा शिक्का अखेर बिचारीच्या कपाळीं मारला जातो. भुकेनें व्याकुळ झालेल्या मुलांच्या पोटासाठीं थोडी चोरी करणारी मोलकरीण आरोपीच्या पिंजऱ्यांत उभी राहते आणि आपल्या ऐदी व खुशालचेंडू पोरांची चैन सात जन्म अबाधितपणें चालावी म्हणून प्रतिष्ठितपणें समाजाला लुटणारा मालक साक्षीदाराच्या पिंजऱ्यांत उभा राहून तिच्या गुन्ह्याची कहाणी सांगूं लागतो.

## चोरीचें शिक्षण

दरिद्री आईबापांचीं पोरेंही " गुन्हेगारी " च्या वृत्तीला सतत बळी पडत असतात. त्यांना रहावयास जागा गलिच्छ व गर्दीचीच असते; खावयाला नित्य मिळतेंच असें नाहीं; सोबत चांगल्या मुलांची कधीं नसतेच ! आजुबाजूला श्रीमंतांचीं मुलें चैन करतांना त्यांना नेहमींच दिसतात. आईबाप सकाळपासून रात्रीपर्यंत कष्ट करण्यासाठीं बाहेर गेलेले असतात आणि त्यामुळें या मुलांच्यावर देखरेख कोणतीच नसते ! याप्रमाणें जीवन घालविणाऱ्या मुलांनीं गुन्हेगारी करण्यास सुरुवात केली तर कसलें आश्चर्य ? प्रख्यात इंग्रजी कादंबरीकार चार्लस डिकन्स यांनीं आपल्या " आलिव्हर ट्विस्ट " या कादंबरींत, लहान मुलांना गुन्ह्याचें शिक्षण कसें दिलें जातें, याचें अत्यंत वास्तवपूर्ण पण हृदय-विदारक चित्र रेखाटलें आहे. आमच्या गरीब समाजाकडे पाहिलें म्हणजे डिकन्सनें रंगविलेल्या " फगीन " या नांवाच्या

अणुक्रमणिका

म्हाताऱ्याप्रमाणें अनेक चौर्य-कर्म-तज्ज्ञ आमच्या दरिद्री आईबापांच्या मुलांना चोरी करण्याचें शिक्षण देत असल्याचें दिसून येतात. सरकारनें गरिबांसाठीं "मोफत आणि सक्तीच्या शिक्षणाची सोय" आर्थिक अडचणीमुळें केली नसली तरी कांहीं महाभाग स्वतःच्या आर्थिक अडचणीमुळें गरिबांच्या मुलांना चोरी करण्याचा "हस्तव्यवसाय" मोफत व सक्तीनें शिकवीत असतात यांत कांहीं शंका नाहीं.

## चोरीचे आळही गरिबावरच !

"गरीबी हा गुन्हा आहे" हें काव्य आपण नेहमीं ऐकतों. या वाक्याचा प्रत्यक्ष अनुभवही अनेक गरिबांना येतो. दारिद्र्यामुळें कंटाळून अगर अडचणींत सांपडून कांहीं लोक सहकुटुंब सहपरिवार गुन्ह्यास प्रवृत्त होतात, असें वर मी दाखविलें आहे. पण कोणताही गुन्हा न करतांच कांहीं लोकांवर, केवळ त्यांच्या गरिबीमुळें, "गुन्हेगार ठरण्याचा" प्रसंग येतो. एखाद्या श्रीमंत मनुष्याच्या घरीं चोरी झाली कीं प्रथम पोलिसांची नजर त्या घरांतील नोकर-वर्गाकडे वळते. गबर बापाच्या खिशांतील पाकीट अगर आईच्या दागिन्याच्या पेटींतील दागिना लाडक्या पण व्यसनी पोरानें उडविलेला असला तरी त्यांच्या-कडे कोणीही संशयानें पाहणार नाहीं. प्रथम संशय "धोंडी" गड्याचा किंवा "दगडी" मोलकरणीचा ! आमचें पोलिसखातें हें अक्कल-हुशारीनें गुन्ह्याचा तपास करण्याचा क्वचितच प्रयत्न करतें. स्वतःच्या हाताचा आणि तोंडाचा उपयोग करूनच ते संशयित आरोपीच्या "हृदयपरिवर्तना" चा चमत्कार घडवून आणून त्याचा कबुलीजबाब मिळवितात. पोलिसांचा छळ सहन करण्यापेक्षां न केलेला गुन्हा कबूल केलेला बरा, असा विचार करून गरीब "गुन्हा केला" असा जबाब देऊन मिळेल ती शिक्षा भोगण्यास तयार होतो. गाल्सवर्दीनें आपल्या "सिल्व्हर बॉक्स" या नांवाच्या नाटकांत श्रीमंतांच्या उनाड व व्यसनी पोरानें केलेली चोरी गरिबांच्या माथीं कशी मारली जाते, याचें चित्र रेखाटलें आहे. अनेक गरीबांच्या खडतर आयुष्यांत असे प्रसंग येतात हें फौजदारी कोर्टांतील कोणीही वकील सांगूं शकेल !

## मारूनमुटकून बनविलेले गुन्हेगार

खोटा चोरीचा आळ आलेले सर्वच गरीब गुन्हा कबूल करतात असें नाहीं. पोलिसांनीं कितीही मारपीट केली तरी कांहीं भाबडे व पापभीरू लोक हा गुन्हा कबूल करण्याचें साफ नाकारतात. "प्राण घेतला तरी जो गुन्हा मी केला नाहीं तो गुन्हा 'मी केला' असें सांगणार नाहीं" असें ते तपास करणाऱ्या अधिकाऱ्याला सांगतात. त्यांना मारून दमलेला अधिकारी, त्यांनीं गुन्हा केलाच आहे, असें गृहीत धरूनच चालतो. ज्या अर्थीं तो अगर ती गुन्हा कबूल करीत नाहीं त्या अर्थी तो अगर ती अट्टल गुन्हेगार असली पाहिजे अशी तो आपल्या मनाचीच खात्री करतो. आणि कांहींतरी साक्षीदारांचीं नांवें घालून आरोपपत्र न्यायाधिशाकडे पाठवितो. कोर्टाच्यापुढें नेलें कीं या गरीब आरोपीच्या छळाच्या दुसऱ्या कांडास सुरुवात होते. कोर्टांचे अनेक शिरस्तेदार "गुन्हा कबूल कर म्हणजे साहेब थोडक्यांत सोडतील" असें त्यास सांगूं लागतात. पोलिसचे जमादार किंवा इतर प्रॉसिक्यूटर पुष्कळ वेळ त्याच्या मनाला मोह पाडण्यासाठीं "पहिला गुन्हा माफ होईल" असें आमिष त्याच्या-पुढें धरतात. न्यायाधीशहि आपल्या वागणुकीनें "आपण गुन्हा कबूल केला तरच ठीक. नाहींतर आपल्यावर भलताच प्रसंग ओढवेल" असा त्या आरोपीचा समज होण्यास मदत करतात. या सर्व कारणांचा सामुदायिक परिणाम होऊन कांहीं आरोपी "मी गुन्हा केला" असें म्हणण्यास तयार होतात. आणि मग न्यायाधीश, शिरस्तेदार व प्रॉसिक्यूटर हे 'बरी कटकट वाचली' अशा समाधानाचा सुस्कारा सोडून त्या आरोपीवर "गुन्हेगार" हा छाप मारून कर्तव्य केल्याचें समाधान उपभोगूं लागतात.

कांहीं आरोपी याप्रकारें ढेपाळले, तरी कांहीं आरोपी अधिक नेटकपणा दाखवून, या दुसऱ्या अवस्थेंतही गुन्हा कबूल करण्याचें नाकारतात. आणि मग त्याच्या छळाच्या तिसऱ्या कांडाला सुरुवात होते. या गरीब जिवाला कायद्याची माहिती नसल्यामुळें तो भांबावून गेलेला असतो. त्याच्या भोंवतीं वकिलाचे अडते गोळा होऊन आपआपल्या

वकिलांच्या कौशल्याची तारीफ करूं लागतात. कांहीं आरोपीजवळ विष खावयासही पैसा नसतो, ते वकिलाला अगर त्याच्या वगलवच्च्यांना कोठून पैसे देणार ? खंक कूळ आहे, असें दिसलें कीं हे अडतेही बाजूला होतात. हाडाला मांस असलें तर कुत्रें तें चघळतें पण त्या हाडाला कांहींच मांस नाहीं असें दिसलें कीं कुत्रेंही तें टाकून नाहीं कां देत ?

नंतर आरोपीच्या विरुद्ध पुराव्याला सुरुवात होते. आरोपीचा बचाव करण्यास वकील नाहीं असें दिसलें कीं सर्वांनाच मोकळें मैदान सांपडतें. साक्षीदार "ईश्वराला स्मरून" खोटें बोलतो. आरोपीला "उलट सवाल विचारावयाचा आहे कां" अशी कोर्ट पृच्छा करतें. पण ती काय विचारणार ? अखेर पुराव्याचें नाटक संपून शेवटीं कोर्ट त्याचा गुन्हा शाबीत धरून त्याला दोषी ठरवितें. आणि गुन्हेगारांच्या यादींत एक नांव जादा लिहिलें जातें !

गरीब एकदां गुन्हेगार ठरला कीं मग पोलिसच्या यंत्रांत तो पक्का सांपडला जातो. कोठेंही कसलाही गुन्हा झाला कीं या गरीब गुन्हेगाराच्या मागें पोलिसांचा संतापकारक ससेमिरा लागतो व तेच तेच लोक पुन्हा पुन्हा भरडले जातात. पोलिसखातें त्यांना "धंदेवाईक व पटाईत चोर" बनवितें. आणि तुरुंगांतील अधिकारी त्यांच्या डोक्यावर काळी टोपी चढवितात. चोर म्हणून सर्वांच्या उपेक्षेस व हेटाळणीस पात्र झालेला तो चोर मग समाजावरचा आपला राग व्यक्त करण्यासाठीं बेडरपणें व उघडपणें चोऱ्या करूं लागतो. समाजानें त्याचा छळ केलेला असतो म्हणून तोही त्वेषानें समाजाचा वैरी बनतो.

## गुन्हेगारीचें कारण मनोविकृति

दारिद्र्य व तज्जन्य परिस्थिति याखेरीज इतरही कांहीं अन्य कारणांमुळें गुन्हेगारीची वृत्ति जन्माला येते. या कारणांपैकीं मनावर ताबा नसणें हें एक कारण आहे. कांहीं लोक भयंकर तापट असतात. दुर्वास ऋषींचे किंवा जमदग्नीचे हे अर्वाचीन अवतार संतापानें भान विसरून कधीं काय करतील, याचा नेम नसतो. पण या लोकांच्या हातून चोरी, दरोड्यासारखे गुन्हे होणार नाहींत. असे रागीट व पिसाट लोक शिवीगाळ, मारहाण व खून अशा प्रकारच्या गुन्ह्यांत सांपडले जातात. १९४१ च्या वैयक्तिक सत्याग्रहाच्या कारणानें मी तुरुंगांत असतांना त्या ठिकाणीं एक खिश्चन कैदी मला भेटला. त्यानें विशेष कांहीं कारण नसतांना आपल्या मुलाचाच खून केला होता. त्याचप्रमाणें साताऱ्यांतील पवार या नांवाचा खुनीही मला तेथें भेटला. त्यानेंही जमिनीवरून भांडणतंटा होताच रागानें वेडें होऊन ५ । ६ माणसांचे बळी घेतले होते. या बळींपैकीं एक दोन-तीन महिन्याचें मूल होतें.

मनावर ताबा नसणें हा स्वभावदोष असला तरी समाजानें अशा माणसांना शिक्षण देऊन विचार करावयास शिकविलें नसतें, हेंही ह्या दोषाचें एक कारण आहे. ज्याप्रमाणें शरीरांतील दोष शस्त्रक्रिया करून किंवा इतर वैद्यकीय उपचार करून नाहिसे करतां येतात त्याचप्रमाणें प्रत्येक मनुष्याचा स्वभाव पाहून दिलेलें योग्य शिक्षणही त्याचा मूळचा रागीटपणा पुष्कळसा कमी करूं शकतें.

रागीटपणाप्रमाणें कांहीं मानसिक विकृति अगर उणीव (Mental abnormality or deficiency) असली तरीही मनुष्याच्या हातून गुन्ह्याचें कृत्य होतें असें कांहीं तज्ज्ञ सांगतात. एका काळीं या कारणाला शास्त्रज्ञ बरेंच महत्त्व देत होते. पण त्यानंतर मनाची चांचणी (Mental test) घेण्याची युक्ति अवगत झाली. या युक्तीचा उपयोग करून हजारों लोकांच्या व विशेषतः पहिल्या महायुद्धाच्या वेळीं अमेरिकन सैनिकांच्या मनाच्या परीक्षा घेण्यांत आल्या. या चांचणीमुळें त्यांपैकीं हजारों लोकांच्या ठिकाणीं कांहीं तरी मानसिक असाधारणता अगर उणीव असल्याचें दिसून आलें. व असें असतांही ते कोणताही गुन्हा करीत नव्हते अगर गुन्हेगारीकडे त्यांच्या मनाची ओढ नव्हती, हेंही दिसून आलें. या अनुभवानंतर वर दिलेलें कारण बरेंच मागें पडलें.

## गुन्हेगार हा 'जन्मतःच' गुन्हेगार असतो कां ?

कांहीं तज्ज्ञ एका काळीं "गुन्हेगार जन्मतःच गुन्हेगार वृत्तीचा असतो" असें मत ठामपणें प्रतिपादीत असत. इटालींतील लोम्ब्रोसो, व त्याचे सहकारी फेरी व गेरोफोलो यांच्या संशोधनामुळें हें मत

जन्माला आलें. या मताच्या आधारानें बोलणारे पंडित "गुन्हेगार वृत्तीच्या माणसाची सुधारणा करतां येणें शक्य आहे" या म्हणण्याला जोरानें विरोध करीत असत. आपल्या जुन्या हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें मनुष्याचा पिंड जन्मतःच चांगला किंवा वाईट बनतो, असें मानण्यांत येत असे. लोम्ब्रोसोचें मत व वरीलप्रमाणें हिंदुधर्ममार्तंडाचें मत यांत बरेंच साम्य आहे कांहीं चांगल्या लोकांनाही कांहीं तरी वस्तु चोरण्याचें वेड असतें. ते या जन्मतः प्राप्त झालेल्या मनःपिंडामुळेंच असेंही या मताचे उपासक सांगत असत !

एका काळीं या मताला भाव असला तरी आतां या मताला कोणी विशेष महत्त्व देत नाहीं. गुन्हेगारीची वृत्ति हा एक रोग आहे व कांहीं उपाययोजना केली तर हा रोगही बरा करता येईल. असेंच आजच्या मताचे वारे वाहात आहेत.

## गुन्हेगारीवर इलाज

" गुन्हेगार हे समाजाचे शत्रु आहेत " असें आतांपर्यंत आपण मानीत आलों आहोंत व आजही लाखों लोकांचें मत हेंच आहे. 'गुन्हेगारांना जबर शिक्षा करून समाजाचें रक्षण करा' असें हे लोक रात्रंदिवस किंचाळून सरकारला सांगत असतात. समाजाची हल्लींच्या विषमतेवर आधारलेली रचनाच या पापाचें मूळ आहे. समाजांतील आर्थिक व सामाजिक विषमतेमुळें गुन्हेगार निर्माण होतात. " या गुन्हेगारांच्या अत्याचारापासून समाजाचें रक्षण करा " अशी ओरड करण्याऐवजीं " गरीबिचाऱ्या गुन्हेगारांचें समाजाकडून होणाऱ्या अत्याचारापासून रक्षण करा " असें म्हणण्याची आतां वेळ आली आहे. गुन्हेगारी नष्ट करण्यासाठीं समतेवर आधारलेली समाजरचना जन्माला आणणें हाच एक प्रभावी मार्ग आहे. रशियांतील पूर्वीच्या विषम भांडवलशाही समाजरचनेंत गुन्हे करण्याचें प्रमाण फार मोठें होतें. पण साम्यवादावर आधारलेली समाजरचना जन्माला येतांच बेकारी, उपासमार नष्ट होऊन सर्वांना सारखें शिक्षण मिळूं लागलें व त्यामुळें गुन्हेगारीचें प्रमाणही एकदम घटलें. जे थोडे लोक अजूनही गुन्ह्याला प्रवृत्त होतात त्यांना " मानसिक व्यथा झालेले रोगी " समजून औषधोपचार करण्यांत येतात व त्या उपचारामुळें हे लोकही गुन्हेगारीपासून परावृत्त झालेले दिसतात.

या लेखाच्या आरंभीं दिलेल्या पं. नेहरू यांच्या विचारांचें आम्ही चांगलें मनन केलें तर गुन्हेगाराला समाजाचे शत्रु लेखण्याची आमची आजची अशास्त्रीय वृत्ति खात्रीनें कमी होईल.

# उर्वशीचा शाप

श्री. चिंतामणी यशवंत मराठे

प्रेमभरांत आलेली कोण-तीहि स्त्री सुंदर दिसते. मग तिला ना वयाची मर्यादा, ना रंग-रूपाची अपेक्षा.

असें जर आहे तर उर्वशीसारखी स्त्री आणि तिचें प्रेमभरांत येणें म्हणजे कृष्ण चतुर्दशीला सूर्य-चंद्राची युति होणें, अथवा सोन्याच्या फुलाला चाफ्याचा सुवास येणें, अथवा शीतळ चंद्र–किरणांना अमृत–कणांची जोड मिळणें अशासारखें नव्हे काय?

उर्वशी प्रेमभरांत आली, तशी त्या प्रेमाच्या उधानावरोबर प्रेमाचा आंधळेपणाही पदरीं घेऊन आली. गुलाबाबरोबर कांट्याची बोंच आल्यावांचून कशी राहील!

वास्तविक उर्वशीला त्रिभुवनांत जोड नाहीं, असें तिचें लावण्य! शृंगार–साधनांची तिला खडा–न्–खडा माहिती! चित्तवेध अचूक करण्याची लकब हा तिच्या हातचा मळ! पण ती स्वतःच प्रेमांत गुरफटली आणि तिच्या या सगळ्या कला–कुसरी थोट्या–पांगळ्या होऊन गेल्या. म्हणून तिनें घृताची नामक अप्सरेला मुद्दाम पाचारून आणिलें.

घृताचीला प्रथम हें खरेंच वाटे ना कीं, उर्वशीनें सौंदर्य–साघनासाठीं इतरांचें साह्य घ्यावें कशाला? भूल पाडावयाचा आणि ती सौंदर्याच्या विशिष्ट खुलावटीवर हें काम एकटी उर्वशीच करूं जाणे, असा अवघ्या इंद्र-लोकांत तिचा डांगोरा! मोठ-मोठ्या तपोनिधींचें तेजोहरण आजवर तिनें लीलेनें केलेलें! अवघडांत अवघड पेंच पडला कीं तो सोडविण्यासाठीं सहस्राक्ष इंद्रानेंही तिचें नांव घ्यावें असा तिचा डौल! मग घृताचीसारखी अप्सरा तिच्या सौंदर्य–साधनांत भर ती काय घालणार! कामशास्त्रांतील एखादा नवा मंत्र तो काय सांगणार! आणि वेळ पडल्यास अनुकूल–प्रतिकूल मत तें काय देणार! पण नाहीं. उर्वशी प्रेमभरांत आली, तशी नव्यानें तरुण झाली, तशी अल्लडही बनली. आणि मग ती घृताचीला हें कीं तें, असें अजाणपणानें विचारूं लागली.

नाना प्रश्न तिनें विचारिले. आणि ते देखील अगदीं अवखळपणानें. फुगीर गालांतून लाडिक-पणानें शब्द उच्चारण्याची बालिश लकबही तिनें अंगिकारली. बदलणाऱ्या दिनमानावरोबर बदलणाऱ्या रंगाच्या सूक्ष्म छटा एरवीं तिनें अधिकारी वाणीनें सांगाव्या पण तीच आतां गोंधळून गेली. वस्त्राचा कोणता रंग, अलंकाराचा कोणता घाट, कांहीं म्हणून कांहीं तिला सुचेना!

"फेसाळ चांदण्यांत हंसासारखें हें धवल वस्त्र बरें दिसेल कीं मोराच्या कंठासारखें हें नील वस्त्र उठावदार दिसेल? रुणझुणणारे हे पायांतले नूपुर, वाऱ्यानें हलणारीं हीं हंसरीं कर्ण–कुंडलें, उरोजांवर रुळणारी ही मणिमाला, कटिप्रदेशावरून ओघळणारी ही मेखला,––घृताची, काय लेवूं? कसें लेवूं? कोणतें प्रसंगोचित ठरेल, कोणतें शोभून दिसेल तेंच नेमकें आणि नेटकें सांग. हेंहि बरें आणि तेंहि बरें, असलें गोळाबेरजेचें, भोपळसुती बोलणें बोलूं नको. भात्यांत तर एकच बाण शिल्लक आहे आणि लक्ष्य

तर हुकतां कामा नये, अशा वेळीं पारधी जसा प्रत्यंचेवर चढविलेल्या त्या एका बाणावर सगळें लय-लक्ष एकवटतो, तशी माझी आजची अवस्था आहे, हें लक्षांत घे. अर्जुनानें देवेंद्रापासून संपादन करावयाची सगळी अस्त्रविद्या हस्तगत केली आहे. चित्रसेन गंधर्वाकडून वाद्य–गीतादि सगळ्या ललितकला त्यानें आत्मसात् केल्या आहेत. तो कृतकार्य झाला आहे. आणि आतां तो येथील निवास संपवून परत जाणार आहे, समजलीस ? ''

अर्जुनाचें नांव निघतांच घृताचीची थोडीबहुत निराशाच झाली. तिला वाटलें होतें कीं उर्वशी ज्या अर्थी एवढ्या अव्वल दर्जाची तयारी करीत आहे, त्या अर्थी पृथ्वीवर तसाच कांहीं प्रसंग बनून आला असेल, आणि सर्व देवांच्या अनुमतीनें उर्वशी कोणा महाभागाचें तेजोहरण करावयास निघाली असेल. पण—

" अर्जुन ? आणि अर्जुनाच्या अनुनयासाठीं कां तूं हा साज सजवीत आहेस ? ''

" कां बरें ? इतका क्षुद्र वाटतो कां अर्जुन तुला ? ''

" क्षुद्र आणि उच्च ! कांहीं झालें तरी तो मानव आहे. मर्त्य लोकांतला आहे. ''

" म्हणून काय झालें ? मानव झाले तरी आमच्या तोलाचे असतात बरें कां ! मनोविकारांचा विलास तेहि करतात. प्रेम आळवितात. शिवाय आमच्यापेक्षां मानवांत एक गुण अधिक आहे ! ''

" आमच्यापेक्षां ? ''

" अग होय. त्यांच्या मनानें घेतलेल्या कोणत्याहि विषयांत ते कमलिनीवर जडलेल्या भृंगाप्रमाणें नितांत आसक्त होतात. आणि भावनांचा उमाळा राखून न ठेवितां पान्हवलेल्या धेनूप्रमाणें सर्वच्या सर्व ते ओपून टाकतात. घृताची, केवढा अनमोल गुण आहे हा ! ''

" मी हा गुण मानीत नाहीं. ''

" मग ? ''

" दोष मानित्यें. ''

" तूं एखाद्या मानवावर अद्यापि आसक्त झाली नाहींस, असें दिसतें. प्रेमाचा उल्हास–बिंदु सूक्ष्मांत सूक्ष्म आणि स्थूलांत स्थूल अनुभविण्याचा प्रसंग तुला नाहीं. प्रेमाच्या रसरंगांत मनानें आणि देहानें मानव जसा एकरूप होऊं शकतो, तसा यक्ष, सिद्ध, गंधर्व कोणी होऊं शकत नाहीं. मानवाच्या प्रेमक्रीडेंत पारिजातकाचें अस्तरण असतें, तें इतरांत कदापि आढळणार नाहीं. ''

" समजल्यें ! तो पुरूरवा मानवच होता नव्हे कां ? पण तुझें आणि त्याचें प्रेम–चरित्र कोणाला हर्षद वाटत असेल तर वाटो बापडें ! तुमच्या त्या चरित्रावरून मला तर असें वाटतें कीं मानवाची बौद्धिक कक्षा फार संकुचित आहे. अग, प्रेम हें अटीनें अटकत नाहीं अथवा अटकेल तें प्रेम कसचें एवढी साधी गोष्ट राजा म्हणविणाऱ्या त्या पुरूरव्याला उमगू नये ? पण तो तुझ्यामागें रुंजी घालूं लागला. पुरुषानें इतकें लंपट होऊन मागें लागणें हें मला रुचणारें नाहीं. आणि त्या अटी भंगल्या तेव्हां कोण त्या बिचाऱ्याची दैना ! प्रेमानें माणसाचें उत्थान न होतां असा अधःपात होत असेल, तर तें प्रेम विकृत आहे असेंच म्हटलें पाहिजे. बिचारा पुरूरवा ! ''

* * *

" उर्वशी ! उर्वशी ! ''

" कोण ? ''

" मी पुरूरवा. माझी हांक ऐकूं येई ना, माझा शब्द ओळखे ना, इतकी तूं माझ्यापासून दुरावलीस ? हये जाये मनसा तिष्ठ घोरे वचांसि मिश्रा कृणवावहै नु । न नौ मंत्राः अनुदितासः एते मयः करन् परऽतरे चन अहन् ॥ ''

" किम् एता वाचा कृणव तव ? उषःकालाची प्रभा जशी जाणारच तसें मलाहि तुला त्यजून गेलेंच पाहिजे. कशाला हे दीनवाणे शब्द ? जा, मागें फिर, आपल्या मंदिरांत परत जा. वारा जसा कोंडून ठेवितां येत नाहीं, तसें मलाहि कोणी डांबून ठेवूं शकणार नाहीं. मृगजळामागें लागून फळ काय ? ''

" किती तोडून बोलतेस ! किती कडवट बोलतेस तूं ? ''

" पण तेंच खरें आहे. मी थांबूं शकत नाहीं. ''

" तूं मला टाकून चाललीस त्या अर्थीं खरेंच असलें पाहिजे तें ! उर्वशी, माझ्यासारखे मर्त्य मानव तुझ्यासारख्या स्वर्गीय अप्सरांच्या ठिकाणीं प्रेमभावना निगडित करितात, पण सत्तेच्या अगर पराक्रमाच्या जोरावर त्यांना ठाणबंद करूं शकत नाहींत, तेव्हां त्या स्वर्गांगना हंसीप्रमाणें नटत-मुरडत अथवा अश्वांप्रमाणें जाभाडांत लगाम चघळतांना ओठांचा खेळ करीत, माना वेळीत, ठुमकत निघून जातात. पण तूं तरी तसें करूं नको. आणि तसें कांहीं तुला करावयाचेंच असेल तर निदान आपल्या सहवासाची आठवण म्हणून कांहीं मागें ठेवून जाणार नाहींस कां ? तेवढें जरी तूं केलेंस तरी माझें उर्वरित आयुष्य सुखाचें जाईल. "

" बरें आहे. राजा, तूं इच्छितोस तें घडून आलें आहे. "

" काय ? खरेंच घडून आलें आहे ? खरें बोलतेस तूं हें ? कुठें आहे तो ? दाखीव मला. सांग त्याच्या खाणाखुणा ! पित्याला ओळखेल तो ?"

" नाहीं. अजून नेणता आहे. "

" मग इतक्या नेणतेपणांत तूं त्याला टाकून निघालीस ? मला सोडून जाण्यांत तुझें प्रेम आटून गेलें, तसें त्याला सोडून जाण्यांत तुझें वात्सल्यहि आटून गेलें काय ? "

" प्रेम-वात्सल्यासारखे मानवी गुणांचे पाश मला बांधूं शकत नाहींत. आम्ही स्वतंत्र लोकींचे रहिवासी. स्वैर-संचार हा आमचा स्वभावधर्म आहे. "

" तुमचा रहिवास अथवा स्वभावधर्म आम्हाला कांच लावितो त्याची वाट काय ? "

" वावगे शब्द कशाला वेंचतोस ? विरहानें उगाच वेडा कां होतोस ? मंदिरांत परत जा आणि त्याची प्रतीक्षा कर. तोच तुझें शांतवन करील. तुझा जिव्हाळा आणि माझा तोंडवळा घेऊन जन्मला आहे तो. "

" अरे रे ! मग माझ्या दुःखाला सीमाच उरली नाहीं. त्याच्याकडे पाहात मला तुझी आठवण व्हावी आणि त्याचें प्रतिबिंब तुझ्या मुद्रेंत उमटलेलें पाहावें तर तूं जवळ नसावेंस ! प्रेमाचा परिपाक तुझ्यावांचून कसा गोड वाटेल मला ! हर्षभरानें टाळी वाजविण्यासाठीं म्यां हात उचलावे आणि तुझ्या आठवणीचा हिंवाळा बाधून ते गळलेल्या पानासारखे टपकन् खालीं यावे. प्रिये, अपत्याचें कौतुक एका हातीं पुरें होत नाहीं. किती अभागी मी ! "

" वांट्याला आलें तेवढेंच भाग्य मानून समाधान करून घ्यावें. "

" काय तुझ्या शाब्दिक सांत्वनानें होणार ! त्यानें माझा ताप शांत होऊं शकत नाहीं. मी अस्थानीं प्रेम केलें हें शल्य मला सदैव जाचत राहणार ! एकूण तो मातृविहीन म्हणून रडणार आणि मी सहचरीविहीन म्हणून आक्रोश करणार ! "

" त्याचे अश्रु मी पुशीन; पण तुझा आक्रोश मला थांबवितां येणार नाहीं. राजा, मी जात्यें. "

* * *

" अर्जुना, कोणी सांगितली तुला ही कुळकथा ? "

" उर्वशी, ऋग्मंत्रांत समाविष्ट झालेली ही कथा वेद म्हणणारांच्या तोंडीं सर्वत्र आहे. 'पुरूरव्याची आसक्ति आणि उर्वशीची उपेक्षा' याचें उत्तम उदाहरण म्हणून सूक्तकारांनीं ती प्रथम त्रिष्टुप छंदांत रचिली आणि मग ती चिरंजीव वाङ्मयांत दाखल झाली."

" प्रणयप्रसंगाच्या असल्या खाजगी गोष्टी वाङ्मयांत दाखल करण्याची उठाठेव सूक्तकारांना कोणी सांगितली होती ? "

" जीवनांत अनुभविलेले बरे-वाईट प्रसंग वाङ्मयांत दाखल करण्याची इच्छा स्वाभाविक आहे. उलट कोणाच्या सांगण्यावरून तयार झालेलें वाङ्मय हेंच कृत्रिम म्हणून त्याज्य होय ! तुझी आणि पुरूरव्याची कथा बनावट आहे, असें तुला म्हणावयाचें आहे काय ? "

" मला पुष्कळ म्हणावयाचें आहे ! "

" पण ऐकतो कोण ? धाय मोकलणारा पुरूरवा पुष्कळांनीं पाहिला असेल. आणि त्याच्या दुःखाचें



अणुक्रमणिका

कारण पुष्कळांनीं समजून घेतलें असेल. त्याची दीनावस्था पाहून सूक्त रचिलें गेलें असल्यास नवल नाहीं. ''

'' पण त्यांत माझा पाणउतारा कशासाठीं ! ''

'' तुझी तक्रार रास्त आहे. तुझ्या स्वरूपाचे, अंगढंगांचे, नृत्यकौशल्याचे पवाडे कोणी तोंडभर गाइले तर ते तुला आणि तुझ्यासारख्या कलावंतांना गोड वाटतात, रिझवितात. पण तुमच्या अमर्याद जीवनाचे तितक्याच रसाळपणानें काढलेले वाभाडे तुम्हांला रुचत नाहींत. कसे रुचतील ! ''

'' राजा पुरूरव्याच्या प्रेमाइतकेंच माझेंहि प्रेम अकृत्रिम होतें. मी त्याला सोडून गेल्यें, तें प्रेमाच्या अभावामुळें नव्हे. गंधर्वलोकांतील संकेतास अनुसरुन मला जावें लागलें. मर्त्यलोकांत शाश्वत राहणें मला शक्य नव्हतें. ''

'' अगदीं बरोबर. आसक्ति ही जन्मतःच आंधळी. त्यांतून कामासक्ति तर कामीजनाच्या सुखचर्येपलीकडे जग म्हणून कांहीं वस्तु आहे, हें ओळखीत नाहीं. त्यामुळें कामांत दंग झालेल्यांना लोक काय बोलतात याची दखल नसते आणि क्षितीही नसते. यांत तुझा काय दोष ? ''

'' हें उपरोधाचें बोलणें कशाला ? अर्जुना, क्षणभर पक्षपात बाजूला ठेवून विचार केलास तर तुला दिसून येईल कीं माझ्या अटी पुरूरव्यानें मोडल्या ! अटींची पाळणूक आंखबंद होती तोंवर मी राहिल्यें होत्येंच कीं नाहीं ? ''

'' राहिली होतीस ? आणि अटी भंगल्या म्हणून तूं गेलीस. एरवी तूं राहिली असतीस असेंच ना ?''

'' निखालस ! ''

'' मनुष्य पेंचांत यावा म्हणून रान उठवीत असावयाचें, तो पेंचांत आलेला पाहून त्याच्यावर अटी लादावयाच्या आणि त्या अटी मोडण्यावांचून गत्यंतर नाहीं असा नवा पेंच निर्माण करावयाचा. कारण–कार्य-परंपरा अजमावून त्याप्रमाणें घडण घडाविण्यास कौशल्य लागतें याचें हें उदाहरण आहे उगीच नाहीं सूक्तकारांनीं शब्द वेंचले ? तरी देखील सूक्तकारांनीं सगळी कथा कोठें ग्रथित केली आहे त्या सूक्तांत ? ''

'' सगळी म्हणजे ? ''

'' त्या अटी कशा मोडल्या गेल्या तो नाट्यप्रसंग ? ''

'' तो बाष्कळ आहे. तो सूक्तांत नाहीं ना ? ''

'' सूक्तांत नाहीं हें खरें. पण यत्र यत्र धूमस्तत्र तत्र वन्हिः । अनुमानशक्ति पुढचें काम करूं शकते. पण तुझ्या अटीच लोकविलक्षण होत्या. 'फक्त तूप खाऊनच राहीन' ही अट कशासाठीं ? तूं पुत्रवत् पाळलेले मेंढे राजानेंही त्याच नात्यानें बागवावे हा कोण दुराग्रह ! पण राजा प्रेमवेडा झाला आहे हें तुला पूर्ण माहीत होतें. तुझ्या प्रेमाला मुकण्याची त्याची तयारी नव्हती. म्हणून त्यानें मान्यता दिली. ''

'' आणि तावत्कालापर्यंत तो त्याप्रमाणें वागलाहि. ''

'' सुईमागून जाणाऱ्या दोऱ्याप्रमाणें तें ठीकच होतें. पण कोणाही डोळस माणसानें तें पत्करलें नसतें. म्हणे मेंढे पुत्रवत् मानिले आहेत. कां ? पशुपक्ष्यांना पुत्रवत् मानण्याइतकी तूं क्षणिप्रसव झाली होतीस कीं काय ? त्यांतून पुत्रवत् मानलेले ते तुझे मेंढे शयनमंदिरांत, पलंगाच्या खुराला बांधून ठेवण्याचा तुझा हट्ट. पण त्याच अटीच्या बळावर तूं राजाला पराजित करावयाचें ठरविलें होतेस ! बिचारा राजा ! आपली प्रियतमा दुसरा दिवस उजाडण्यापूर्वीच निघून जाणार आहे, हें त्याच्या मनांतहि आलें नसेल. काम–विलासानें श्रांत होऊन तो झोपी गेला असेल. कदाचित् स्वादिष्ट मदिरेचा पेला तुझ्या आग्रहाखातर त्यानें अधिकच घेतला असेल. कदाचित् रतिशास्त्रांतील एखादें नवें उपांग त्याच रात्रीं विस्तारून दाखविण्याची तुला लहर आली असेल. कदाचित् सुरतसंग्रामांत हार कुणावर येते याची अहमहमिकाहि त्याच रात्रीं रंगली असेल. अशा स्थितींत अंगावर वस्त्र आहे कीं नाहीं याची शुद्ध कोठली ?

कामतृप्त होऊन राजा निश्चिंतपणें विसावा घेत आहे. शयनमंदिरांतील उन्मादकारी वायूचें ग्रहण करीत ते मेंढेही पहुडले आहेत. पण तूं आणि तुझे गंधर्व–सहचर मात्र पुढील बनावाची नांदी गुणगुणण्यांत दंग ! राजाचें शयनमंदिर प्रवेश मिळविण्यास

एरवीं कोण कठीण ! पण तुझ्या दक्षतेमुळें तशा निवांत वेळीं चोर आले. कशाकरितां ? मेंढे चोरण्याकरितां. जणूं राजाचें सगळें वैभव त्यां मेंढ्यांत सामावलें होतें. उर्वशी, अट मोडण्याचा अचूक खरा पण कोण बाष्कळ उपाय हा ! ते चोर जातिवंत असते आणि त्यांचा केवळ मेंढे चोरण्याचाच मनोदय असता तर मेंढ्यांनीं ब्र काढूं नये म्हणून त्यांनीं खाचितच खबरदारी घेतली असती. उलट, त्या मेंढ्यांनीं जीव तोडून केंकटावें अशी शकल तुझ्या त्या चोरांना लढवावी लागली. ठरल्याप्रमाणें मेंढे केंकाटले. तें ऐकतांच पुत्रप्रेमानें गहिंवरलेली त्यांची माता मुक्तकंठानें आक्रोशूं लागली. 'हाय ! हाय ! माझे लाडके मेंढे कोणी नेत आहेत ! धांवा ! वांचवा माझ्या पुत्रकांना ! ' केवळ मेंढ्यांच्या केंकाटण्यानें राजा जागा झाला नसता. पण प्रियेच्या आर्त स्वरानें तो खडबडून जागा झाला. वस्त्राची क्षिती न बाळगतां धांवला. " कोण नेत आहेत माझ्या वल्लभेचे मेंढे ! " राजाच्या तोंडून शब्द उमटतांच विजेचा लख्ख प्रकाश पडला आणि राजा तुझ्या दृष्टीस पडला. चोरांना अगर मेंढ्यांना साफ विसरून तूं टाळी वाजवलीस "माझी अट भंगली रे भंगली ! " राजा सावध झाला. खजील झाला. पण काय उपयोग ! तूं त्यावेळीं गंधर्व-लोकाच्या मार्गालाहि लागली होतीस ! "

" अर्जुना, सप्त जन्मापूर्वीचें हें वृत्त ऐकण्यासाठीं मी आल्यें नाहीं. असले प्रणयप्रसंग माझ्या दीर्घ आयुष्यांत अनेक येऊन चुकले आहेत. तुम्हांसारख्या मर्त्य मानवांचा आयव्यय एकेका जन्मापुरता असतो. म्हणून तुम्ही अशा गोष्टी घोटीत बसता. आम्हीं त्या विसरून जातों. "

" हाच तुमच्या-आमच्यांत फरक आहे. तूं जशी अप्सरा आहेस, हें विसरूं शकत नाहींस, तसा मी देखील मानव आहें, हें विसरूं शकत नाहीं. तोंपर्यंत मला मानवांचे नीतिनियम पाळले पाहिजेत. जननीच्या नात्यानें मी तुला प्रथमदर्शनींच वंदन केलें, तें त्याच नीतिनियमांना अनुसरून. पूर्वाश्रमींचा संबंध विसरून तूं जरी प्रणययाचना केलीस तरी मला तो संबंध विसरतां येत नाहीं. तुझ्या आणि पुरूरव्याच्या जीवनावरून मी हेंच मानितों कीं दोन भिन्न संस्कृतींच्या स्त्री-पुरुषांचें मिलन झालें तरी तें कामतृप्तीपुरतेंच. तें मीलन दांपत्य-जीवनाचा शाश्वत, एकसंधी पाया होऊं शकत नाहीं. आणि मानवी संस्कृतीप्रमाणें मला दांपत्य-जीवनाविरहित अन्य प्रेमसंबंध जोडतां येत नाहीं. मी आज स्वर्ग-लोकांत असलों तरी केवळ कार्यसिद्धीच्या निमित्तानें आलों आहे. मला मर्त्य लोकांत जावयाचें आहे. तेथें मला पुरुषार्थ गाजवावयाचा आहे. माझ्या अस्त्रसंपादनाकडे माझे भ्राते डोळे लावून बसले आहेत. दुर्दशेची समाप्ति करून आम्हां बंधूंना वैभव प्राप्त करून घ्यावयाचें आहे. अशावेळीं मी क्षणिक मोहाला बळी पडून प्रणयांत गुंतलों तर माझ्या चारित्र्याला कलंक लागेल. यासाठीं तुझा रोष पत्करून, तूं अविचारानें दिलेला शापहि पचवून मला तुझें निराकरण केलें पाहिजे. "

" पांडित्य आणि उपहास या दुहेरी शस्त्रानें तूं मला घायाळ केलें आहेस. तरी देखील इंद्रसभेंत तुझ्या स्वागताच्या वेळीं चाललेल्या नृत्यप्रसंगीं माझ्यावर खिळलेली तुझी कामाकुल दृष्टि मी विसरूं शकणार नाहीं. कारण माझ्या प्रणय-याचनेचें मूळ तेथें आहे. "

" तुझे मनोहर पदन्यास पाहण्यांत माझी दृष्टि दंग झाली होती हें खरें आहे; पण ती कामाकुल होती हें खरें नाहीं. मी ललितकलांचा भोक्ता आहे. म्हणून जेथें जेथें लालित्य दिसेल तेथें मी लुब्ध होतों. शिवाय, मी तुझा उपहास केला अगर राजा पुरूरव्याचें दोषदर्शन केलें तरी तुम्ही दोघेहि मला वंद्य आहां. तुमचा पुत्र आयु, त्याचा नहुष ही कुलपरंपरा मी कशी विसरेन ! "

" असलीं हीं जन्मांतरींचीं नातीं आम्ही मोजीत नाहीं. "

" तें तुमच्या लोकरीतीस अथवा नीतिनियमांस अनुसरून असेल. आमच्या नव्हे. यज्ञासाठीं दर्भ गोळा करण्याचें काम करीत असतां त्यांतलि कांहीं शल्याप्रमाणें बोंचतात. गतवैभव परत मिळविण्यासाठीं अस्त्रविद्या संपादन करीत असतां तुझा शापहि मला शल्याप्रमाणें बोंचणार आहे. पण माझ्या पित्याच्या कृपेनें त्या शापाचेंहि मी वररूप करून घेईन. "

" पण माझ्या याचनेची झालेली निष्फलता मात्र मला सदैव बोंचत राहणार आहे. "

## २

" काय रे विनटा, कोण उभा आहे रे तो ? आणि राजमंदिराकडे असा रोखून कां पाहात आहे ?"

" कुठें ? "

" त्या चबुतऱ्यावर ! राजमंदिराच्या प्राकारासमीप एखादा कपोत घोंटाळत असला तरी तो द्वारपालाच्या तक्ष्ण दृष्टींतून सुटूं नये. आणि हा माणसासारखा माणूस दिसत नाहीं तुला ? तूं काय द्वारपाल आहेस कीं राजा आहेस ? "

" राजा बनवून माझा पाणउतारा करूं नकोस ! नीट बोल. त्या चबुतऱ्यावर ना ? अरे तो माणूस नव्हे, स्त्री आहे ती ! वा रे अनट ! स्त्रीला पुरुष समजणें ही तुझी द्वारपालाची तीक्ष्ण दृष्टी वाटतें ? "

" माझ्यापेक्षा कांकणभर अधिक बुद्धी असेल तुझी. पण पुरुष अगर स्त्री असा लिंगभेदाचा प्रश्न येथे नसून प्राकारासमीप कोणी तरी घोंटाळत आहे कीं नाहीं, एवढाच आहे. "

" बरें पण ती स्त्री आहे हें तुला आतां तरी मान्य आहे ना ? "

" माझ्या मान्यतेवर स्त्रीचा पुरुष थोडाच होऊं शकतो ! अरे पण ती पाहा ! राजमंदिराच्या रोखानेंच येत आहे. तिची ती मत्त गजासारखी गति, पाठीवर रुळणारे लांबलचक केस, कानांतील डोलतीं कुंडलें, हातांतील शंखवलयाकार सुवर्णकंकणें—विनटा, हो पुढें आणि घे शोध कोण, कोठील याचा ! "

स्त्री कीं पुरुष अशी अनटाचीच दिशाभूल झाली असें नव्हे. खुद्द विराट राजाहि तें रूप पाहून भ्रांत झाला. वेष स्त्रीचा पण भाव पुरुषाचा असें स्पष्ट दिसत होतें तरी त्याला क्लीव मानण्यास राजाचें मन घेई ना. म्हणून तो गौरवानें म्हणाला,

" हे वीरा, तूं कोण आहेस ? कोणत्या हेतूनें तूं येथवर आला आहेस ? "

" माझें नांव बृहन्नडा. मी गायन–वादन–नृत्यादि कलांत प्रवीण आहे. राजकन्येला ह्या कला शिकविण्यासाठीं माझी योजना व्हावी, अशा अपेक्षेनें मी आल्यें आहे. "

द्यूतविद्याप्रवीण कंक, सूपशास्त्रज्ञ बल्लव, प्रसाधनविद्याप्रवीण सैरंध्री मालिनी आणि आतां क्लीवत्व दर्शविणारी ही बृहन्नडा, अशीं बाह्यतः क्षुद्र कामें पत्करणारीं पण व्यक्तिमत्वानें डोळ्यांत भरणारी हीं मंडळी महिन्या–पंधरा दिवसांच्या अवधींत येत असलेली पाहून विराटाला आश्चर्य वाटलें. त्यांतून बृहन्नडेचें रूप तर क्लीवत्वाला सर्वस्वीं विरोधक दिसत होतें. अस्त्राचें अगर शस्त्राचें विधान चुकीचें केल्यामुळें कोणी महान् वीर शाप-दग्ध तर झाला नसेल ? हें काय गूढ आहे ? "

तथापि मनांत आलेला हा विचार प्रकट न करतां राजानें सभेचें विसर्जन केलें आणि तो बृहन्नडेसह अंतःपुराकडे निघाला. तेथें परिचारिकांकडून बृहन्नडेच्या क्लीवत्वाची त्यानें प्रथम परीक्षा करविली आणि नंतर राजकन्येला शिकविण्याच्या कामीं तिची योजना केली.



अणुक्रमणिका

# प्राचीन महाराष्ट्र व त्याच्या राजधान्या

महामहोपाध्याय वा. वि. मिराशी प्रिन्सिपॉल, किंग एडवर्ड कॉलेज, उमरावती

अगमदधिपतित्वं यो महाराष्ट्रकाणां
नवनवतिसहस्रग्रामभाजां त्रयाणाम् !*

—ऐहोळें येथील शिलालेख (इ. स. ६३४)

सांप्रत महाराष्ट्र–एकीकरणाची चळवळ चालू आहे. इंग्रज लोकांनीं हिंदुस्थानांतून पाय बाहेर काढला असून गोव्यापासून भंडाऱ्यापर्यंत पसरलेला महाराष्ट्र एक व्हावा, त्याचा एक स्वायत्त प्रान्त बनवून त्याचा हिंदी संघराज्यांत अन्तर्भाव करावा एतदर्थ महाराष्ट्राचे सर्व पुढारी एकवटून प्रयत्न करीत आहेत. अशा वेळीं प्राचीन कालाकडे थोडी दृष्टि फेकून हा अखिल महाराष्ट्र कधीं काळीं एक झाला होता काय, त्याच्या भिन्न भिन्न कालांतील राजधान्या कोणत्या होत्या, इत्यादि विषयांचें विवेचन केल्यास तें वाचकांस महत्त्वाचें वाटेल. म्हणून तसा प्रयत्न प्रस्तुत लेखांत केला आहे.

## महाराष्ट्र या नांवाचा इतिहास

या देशाला 'महाराष्ट्र' ही संज्ञा केव्हां व कशी प्राप्त झाली याचा प्रथम विचार करूं. संस्कृत वाङ्मयांत 'महाराष्ट्र' हें देशवाचक नाम फार उशीरा म्हणजे इ. स. च्या सातव्या शतकांत होऊन गेलेल्या दण्डीच्या 'काव्यादर्श' नामक अलंकार ग्रंथांत प्रथम येतें. कोरीव लेखांतही हें नांव त्याच सुमारास इ. स. ६३४ च्या ऐहोळें येथील जैन कवि रविकीर्ति यांच्या शिलालेखांत प्रथम येतें. तो उतारा या लेखारंभीं दिला आहे. या श्लोकार्धांत चालुक्य सम्राट् द्वितीय पुलकेशी, हा नव्याण्णव हजार गांवें ज्यांत आहेत, अशा तीन महाराष्ट्रांचा स्वामी झाला असें म्हटलें आहे. हीं तीन महाराष्ट्रें कोणतीं याचा पुढें विचार करूं.

'महाराष्ट्र' ह्या देशनामाचे हे दोन्ही उल्लेख इ. स. च्या सातव्या शतकाइतके अलीकडचे आहेत. त्या पूर्वीचीं रामायण, महाभारत, कालिदासाचीं काव्यनाटकें—यांत 'महाराष्ट्र' देशनामाचा उल्लेख नाहीं असें म्हटलें तरी तें देशनाम सातव्या शतकांतच प्रचलित झालें असें समजण्याचें कारण नाहीं. किंबहुना त्यापूर्वी कित्येक शतकें तें प्रचारांत होतें असें दाखवितां येतें. महावंश नामक बौद्धग्रंथांत मोग्गलिपुत्त तिस्स यानें ज्या देशांत बुद्धधर्मोपदेशक पाठविले त्यांची यादी आहे, तिजमध्यें अपरांतक म्हणजे कोंकण व महारठ्ठ म्हणजे महाराष्ट्र यांचा उल्लेख आहे. मोग्गलिपुत्त तिस्स हा अशोकाच्या काळीं खिस्तपूर्व तिसऱ्या शतकांत होऊन गेला.

नर्मदेच्या दक्षिणेस कृष्णा नदीच्या खोऱ्यापर्यंत पसरलेल्या विस्तृत भूप्रदेशांत इ. स. च्या चौथ्या पांचव्या शतकापर्यंत जी भाषा बहुजनसमाजांत प्रचलित होती, तिला महाराष्ट्री हें नांव प्राकृत वैयाकरणांनीं दिलें आहे. या वैयाकरणांमध्यें 'प्राकृत-प्रकाश'कार वररुचि हा सर्वांत प्राचीन होय.

* "जो (द्वितीय पुलकेशी) नव्याण्णव हजार गांवें असलेल्या तीन महाराष्ट्रांचा अधिपति झाला."



अणुक्रमणिका

यानें ' महाराष्ट्री ' प्राकृताला अग्रस्थान देऊन तिचें व्याकरण सविस्तर दिलें आहे व शौरसेनी इत्यादि अन्य प्राकृत भाषांची फक्त जरूर तेथें भिन्न रूपें दिलीं आहेत. या भाषेला इतकें महत्त्व येण्याचें कारण तिजमध्यें झालेली काव्यरचना होय. इ. स. पूर्वीच्या व नंतरच्या दोनतीन शतकांत प्राकृत काव्यगंगेला मोठा पूर आला होता. राजापासून रंकापर्यंत ज्याला ज्याला म्हणून थोडीबहुत प्रतिभा होती, त्यानें त्यानें या प्राकृत भाषेंत गाथा रचल्या होत्या. या गाथांचा संग्रह हालनामक सातवाहन-वंशी राजानें ' गाथासप्तशती ' ग्रंथांत केला. व त्यांच्या भाषेचें व्याकरण वररुचीनें आपल्या प्राकृत-प्रकाशांत केलें. हे दोन्ही ग्रंथकार इ. स. च्या पहिल्या-दुसऱ्या शतकांत होऊन गेले असावे. वररुचीनें महाराष्ट्री प्राकृताचा नामनिर्देश करून व्याकरण लिहिलें असल्यामुळें त्या काळीं ' महाराष्ट्र ' ही देशसंज्ञा प्रचलित होती यांत शंका नाहीं. कारण त्या भाषेला देशनामावरूनच ती संज्ञा प्राप्त झाली होती. दण्डीनेंहि आपल्या काव्यादर्शांत या महाराष्ट्री प्राकृताला उत्कृष्ट गणलें असून ती भाषा महाराष्ट्रांत प्रचलित होती असें म्हटलें आहे—

**महाराष्ट्राश्रयां भाषां प्रकृष्टं प्राकृतं विदुः।**
**सागरः सूक्तिरत्नानां सेतुबन्धादि यन्मयम्॥**

अर्थः—महाराष्ट्रांत प्रचलित असलेल्या भाषेला उत्कृष्ट प्राकृत म्हणतात. या भाषेमध्यें सुभाषित रत्नांचा सागरच असे सेतुबन्धादि ग्रंथ रचिले आहेत.

## प्राचीन महाराष्ट्राचा विस्तार

याप्रमाणें महाराष्ट्र हें नांव इ. स. पूर्वी निदान तीन चार शतकें प्रचलित होतें. तथापि तें वाङ्मयांत व कोरीव लेखांत कोठें विशेष आढळत नाहीं; याचें कारण त्यांत अन्तर्भूत झालेला सर्व प्रदेश एकाच राजसत्तेचा अंकित असा बहुधा नसे. या विस्तृत महाराष्ट्राच्या निरनिराळ्या प्रांतांस भिन्न भिन्न नांवें होतीं. अशोकाच्या शिलालेखांत राष्ट्रिक व पैठणिक यांचा उल्लेख आला आहे. यांपैकीं पहिले, गोप-राष्ट्रासारखे उत्तर महाराष्ट्राचे छोटे प्रांत होते, त्यांतील लोक असावे. पैठाणिक हे अर्थातच पैठणचे किंवा ' पैठण ' ( प्रतिष्ठान ) ज्याची राजधानी होती त्या महाराष्ट्राच्या मध्यभागाचे रहिवासी दिसतात. महा-राष्ट्राच्या इतर भागांचीं नांवेंही इतरत्र येतात—'विदर्भ' हें सध्यांचा वऱ्हाड, मराठी मध्यप्रांत व निजामच्या राज्यांतील मराठवाडा या प्रदेशाचें नांव प्राचीन काळापासून प्रसिद्ध आहे. ' खानदेशाला ' ' ऋषीक ' अशी संज्ञा होती. 'नाशिकला' 'नासिक्य' व त्याच्या पश्चिमेकडच्या प्रदेशाला ' त्रिकूट ' असें नांव होतें. औरंगाबाद जिल्ह्याला ' मूलक ' व अहमदनगर भीड या भागाला ' अश्मक ' म्हणत. कृष्णा नदीच्या खोऱ्याला ' कुन्तल ' म्हणत. विदर्भ, ऋषीक, नासिक्य, त्रिकूट, अश्मक, कुन्तल हे विविध देश ज्यांत अन्तर्भूत झाले आहेत, अशा विस्तृत भूखंडाला महाराष्ट्र ही संज्ञा होती, हें राजशेखराच्या बालरामायणनामक नाटकावरून दिसतें. या नाटकांत श्रीरामचंद्र सीतादेवीसह लंकेहून विमानानें अयोध्येस जात असतां मार्गांत लागलेल्या भिन्न भिन्न देशांचें वर्णन करतात असा प्रसंग घातला आहे. कावेरी नदी ओलांडून कर्नाटक देश पार केल्यावर सुग्रीव रामचंद्राला, ' भरताग्रज, अयमग्रे महाराष्ट्रविषयः ' ( रामा हा पुढें महाराष्ट्र दिसतो पहा ! ) असें म्हणून महाराष्ट्र दाखविता झाला. त्यावेळीं रामचंद्रानें विदर्भ व कुन्तल देशाचें सुंदर वर्णन केलेलें बालरामायणांत दिलें आहे. याच नाटकाच्या तिसऱ्या अंकांत सीतास्वयंवराकरितां जमलेल्या भारतवर्षीय भिन्न भिन्न देशांच्या अधि-पतींचें वर्णन आलें आहे. त्यांत कालविपर्यासाचीं पुष्कळ उदाहरणें आहेत. तथापि त्यावरून तत्का-लीन समजुती माहीत होतात. या राजांमध्यें कुन्तल देशाधिपतीही होता. त्याचें हेमप्रभानामक सखीनें केलेलें वर्णन ऐकून सीता म्हणते, " जो मरहट्ट-वरिठ्ठो " " जो हा महाराष्ट्राधिपति आहे ! " या उद्गारावरूनही कुन्तल देश महाराष्ट्रांत मोडत होता हें उघड आहे. हा कुन्तल देश म्हणजे कृष्णानदीच्या खोऱ्यांतील सातारा, कोल्हापूर, सोलापूर इत्यादि भाग ज्यांत अन्तर्भूत होतात, तो दक्षिण महाराष्ट्र होय हें खालील सुंदर श्लोकावरून दिसून येईल—

**विख्यातकृष्णवर्णे तैलस्नेहोपलब्धसरलत्वे।**
**कुन्तलविषये नितरां विराजते मल्लिकामोदः॥**

ह्या श्लोकांत उत्तरचालुक्यनृपति जयसिंह ऊर्फ मल्लिकामोद याची श्लेषगर्भ स्तुति आहे. याचे दोन



अणुक्रमणिका

अर्थ आहेत. (१) 'कृष्ण वर्णाविपर्यी प्रसिद्ध व तेलाच्या चिक्कणतेनें जे लांबसडक झाले आहेत, अशा (युवतीच्या) केशकलापांत मोगरीचा सुवास अतिशय खुलतो. (२) ज्यामध्यें सुप्रसिद्ध अशी कृष्णानदी वाहत आहे व ज्यांतील लोक तैलप (नृपती) वरच्या राजनिष्ठेमुळें सरळपणानें वागत आहेत, अशा कुन्तल देशांत मल्लिकामोद राजा अतिशय शोभत आहे. या श्लोकावरून कृष्णानदीच्या खोऱ्यांतील दक्षिण महाराष्ट्राला कुन्तल अशी संज्ञा होती हें दिसून येईल.

चालुक्यसम्राट् द्वितीय पुलकेशीच्या वेळीं सुप्रसिद्ध चिनी यात्रेकरू ह्युएनत्संग हा हिंदुस्थानांत बौद्ध-धर्माच्या अभ्यासाकरितां आला होता. त्यानें पुलकेशीचें महाराष्ट्राधिपति म्हणून वर्णन केलें आहे. पुलकेशीची राजधानी कर्नाटकांत वातापिपुरी (सध्याची विजापूर जिल्ह्यांतील बदामी) येथें होती व त्याचें राज्य कर्नाटक, कोंकण, महाराष्ट्र व गुजराथ या देशांवर पसरलें होतें. तथापि त्यामध्यें महाराष्ट्र हा प्रमुख देश असल्यानें त्याला महाराष्ट्राचा राजा म्हणून ह्युएनत्संगानें उल्लेखिलेलें दिसतें. वर उल्लेखिलेल्या ऐहोळें येथील शिलालेखांत त्याला नव्याण्णव हजार गांवें असलेल्या तीन महाराष्ट्रांचा स्वामी म्हटलें आहे. हीं तीन महाराष्ट्रें ठरविणें कठीण नाहीं. त्यांपैकीं विदर्भ हा एक महाराष्ट्र; खानदेश, नाशिक, औरंगाबाद, पुणें, अहमदनगर इत्यादिकांचा उत्तर महाराष्ट्र व कृष्णानदीच्या खोऱ्यांत असलेला सातारा, कोल्हापूर, सोलापूर, विजापूर इत्यादिकांचा दक्षिण महाराष्ट्र–असे ते तीन महाराष्ट्र असावे. सिंध व देशी संस्थानें वगळल्यास मुंबई इलाख्यांत ४४००० खेडीं असावीं असें डॉ. फ्लीटनें म्हटलें आहे. त्या मानानें मुंबई इलाख्यांतील महाराष्ट्र, वऱ्हाड, मराठी मध्यप्रांत व निजामच्या राज्यांतील मराठवाडा या सर्व प्रांतांत मिळून नव्याण्णव हजार खेडीं असलीं तर त्यांत आश्चर्य नाहीं.

येथवर 'महाराष्ट्र' या देशनामाची प्राचीनता व त्याचा विस्तार यांचें विवेचन केलें. आतां हा अखिल महाराष्ट्र ऐतिहासिक कालांत कधीं काळीं एक झाला होता काय, त्यावेळीं त्याच्या राजधान्या कोणत्या होत्या याचा विचार करूं.

## प्राचीन महाराष्ट्राच्या राजधान्या

ऐतिहासिक कालांतील सर्वांत प्राचीन कालखंड मौर्यकाळ होय. या कालखंडांत महाराष्ट्र मौर्य साम्राज्यांत अन्तर्भूत झाला नव्हता. पश्चिम महाराष्ट्राचे राष्ट्रिक, विदर्भाचे भोज व प्रतिष्ठानचे (औरंगाबाद जिल्ह्याचे) पैठणिक–या लोकांना अशोक आपल्या राज्याच्या सरहद्दीवरचे लोक असें म्हणतो व त्यांनीं कसें वागावें अशी आपली अपेक्षा आहे तें आपल्या आदेशांत सांगतो. अशोकाचे लेख महाराष्ट्रांत सांपडले नाहींत. कोंकणांत मात्र ठाणा जिल्ह्यांतलि सोपारा येथें एक खंडित लेख सांपडला होता. त्याखेरिज चांदा जिल्ह्यांतलि देवटेक येथें प्राण्यांची हिंसा करणें किंवा त्यांना पकडणें यांची मनाई करणारा एक लेख प्रस्तुत लेखकानें अलीकडे प्रकाशित केला आहे. तो अशोकाच्या धर्ममहामात्राचा असावा. तेव्हां महाराष्ट्र हा मौर्य साम्राज्यांत अन्तर्भूत होत नसला तरी मौर्यांच्या सत्ताकक्षेत येत होता यांत संशय नाहीं. अशोकाच्या निधनानंतर लौकरच महाराष्ट्रांत सातवाहनाचें विस्तृत व बलाढ्य साम्राज्य पसरलें. या घराण्याचा मूळ पुरुष सातवाहन होता म्हणून त्यास 'सातवाहनकुल' म्हणतात. या राजाचीं दोन नाणीं अलीकडे औरंगाबाद, वारंगळ या भागांत सांपडलीं आहेत. 'प्रतिष्ठान' (हल्लीचें औरंगाबाद जिल्ह्यांतील पैठण) हीं याची राजधानी होती. सातवाहन राजांच्या अंमलाखालीं अखिल महाराष्ट्र एकवटला. या राजांची सत्ता उत्तरेस गुजराथ, काठेवाड, माळवा, पश्चिमेस कोंकण, पूर्वेस आन्ध्र व दक्षिणेस कर्नाटक इतक्या विस्तृत प्रदेशावर होती. त्यामुळें यांना त्रिसमुद्राधिपति (तीन समुद्रांचे अधिपति) असें म्हटलें आहे. यांच्या अमदानींत 'प्रतिष्ठान' नगरी वैभवाच्या शिखरास पोंचली होती. यांनीं यज्ञयागादिक करविले त्याप्रमाणें बौद्धविहारही खोदविले. आणि संस्कृतप्रमाणें प्राकृत भाषेसही राजाश्रय दिला. यांच्यापैकीं हाल नांवाच्या राजानें आपल्या राज्यांतील महाराष्ट्री भाषेंत रचलेल्या कोट्यवधि प्राकृत गाथांमधून सातशें गाथा निवडून काढून आपला गाथाकोश रचला, तो अद्यापि सत्तसई (गाथासप्तशती) या नांवानें प्रसिद्ध आहे. यांच्या राज-



अणुक्रमणिका

वर्टीत नाणेघाट, कार्लें, नाशिक, अजंटा येथील कांहीं लेणीं कोरविलीं गेलीं. ऐतिहासिक कालांतील अखिल महाराष्ट्राचे पहिले राज्यकर्ते व विद्या व कला यांचे उदार आश्रयदाते म्हणून यांचें नांव चिरस्मरणीय राहील.

सातवाहनांचें राज्य महाराष्ट्रांत सुमारें साडेचारशें वर्षें टिकून इ. स. २५० च्या सुमारास त्याचा अस्त झाला. त्यानंतर महाराष्ट्रांत दोन बलाढ्य साम्राज्यें उदयास आलीं. उत्तर महाराष्ट्रांत आभीरांनीं आपलें राज्य स्थापलें व लौकरच त्याचा विस्तार कोंकण, गुजराथ व माळवा या प्रांतांत केला. त्यांची राजधानी अद्यापि ज्ञात नाहीं. तथापि ती खानदेशांत असावी असें वाटतें. कारण खानदेशांत पुढें कित्येक शतकें आभीर राजे राज्य करीत असलेले दिसतात. विदर्भ व दक्षिण महाराष्ट्र अथवा कुंतल या प्रांतांत वाकाटकांचें सुसमृद्ध असें साम्राज्य पसरलें. त्यांची आरंभींची राजधानी 'पुरिका' ही ऋक्षवत् (मातपुडा) पर्वताच्या पायथ्याशीं होती. पुढें यांच्या चार शाखा होऊन त्यांपैकीं दोन विदर्भांत राज्य करूं लागल्या. एकीची राजधानी नागपूरजवळची 'नंदिवर्धन' व दुसरीची अकोला जिल्ह्यांतील 'वत्सगुल्म' (सध्यांचें वाशीम) ही होती. राहिलेल्या दोन शाखा कुन्तल देशांत (गोदावरीच्या दक्षिणेस) राज्य करीत असाव्या. त्यांचा लौकरच अस्त होऊन त्यांची जागा राष्ट्रकूट राजवंशानें घेतली. हे राष्ट्रकूट मूळचे 'लट्टलूर' (निजामच्या राज्यांतील लातूर) चे असून त्यांचा राज्यसंस्थापक मानाङ्क हा होता. यानें आपल्या नांवानें 'मानपूर' नामक एक नगर स्थापून तेथें आपली राजधानी केली. हें मानपूर सातारा जिल्ह्यांतलि माण तालुक्याचें मुख्य शहर माण असावें. या राष्ट्रकूटांना कोरीव लेखांत कुन्तलाधिपति म्हटलें आहे.

या तीनही राजवंशांचा संस्कृत व प्राकृत विद्येस आश्रय होता. प्राकृत भाषेंतील हरिविजय व सेतुबंध हीं मनोहर काव्यें वाकाटक नृपति सर्वसेन व द्वितीय प्रवरसेन यांनीं रचलीं होतीं. त्यांची अनेक संस्कृत ग्रंथकारांनीं मुक्तकंठानें स्तुति केली आहे. राष्ट्रकूटवंशी देवराजानें प्राकृतभाषेचा कोश रचला होता. याशिवाय तीनही राजांनीं प्राकृत भाषेंत अनेक गाथा रचल्या होत्या. त्यापैकीं कांहीं पुढें गाथासप्तशतींत घातल्या गेल्या. यांच्या आमदानींत मेघदूतासारखीं अमृतमधुर संस्कृत काव्यें रचलीं जाऊन वैदर्भी रीतीला सर्व रीतींमध्यें अग्रस्थान मिळालें. वाकाटक व राष्ट्रकूट या दोन्ही राजवंशांचा विद्येप्रमाणें कलेलाही आश्रय होता. अजंठ्याचीं सोळा, सतरा व एकोणीस नंबरचीं लेणीं अद्यापिही शिल्पकाम व चित्रकला या बाबतींत अप्रतिम गणलीं जातात. तीं वाकाटकांच्या राजवटींत त्यांच्या मंत्र्यांनीं व मांडलिकांनीं कोरविलीं होतीं, असा तेथील कोरीव लेखांत उल्लेख आहे. राष्ट्रकूटांचेही दोन लेख एकवीस व बावीस नंबरच्या लेण्यांत अलीकडे सांपडले आहेत. त्यावरून त्यांनींही कांहीं लेणीं कोरविलीं होतीं हें स्पष्ट दिसतें.

इ. स. पांचव्या शतकाच्या अखेरीस वत्सगुल्मच्या हरिषेणनामक वाकाटकवंशी सम्राटाची सत्ता माळवा व गुजराथ या प्रांतांवर व दक्षिणेंत कुन्तल, त्रिकूट, महाकोसल, कलिंग, आन्ध्र इत्यादि बहुतेक सर्व देशांवर पसरली होती. यावेळींही सातवाहनांच्या काळाप्रमाणें महाराष्ट्र दक्षिण हिंदुस्थानांत अग्रेसरत्व पावला होता. हरिषेणानंतर गादीवर आलेला त्याचा मुलगा नादान निघाल्यामुळें वाकाटकांची सत्ता लौकरच संपुष्टांत आली. त्यानंतर उत्तर महाराष्ट्र, कोंकण, विदर्भ, गुजराथ या प्रांतांवर कल्चुरींचें साम्राज्य पसरलें. त्यांची राजधानी 'माहिष्मती' (ओंकार मांधाता किंवा कांहींच्या मतें महेश्वर) होती. कुन्तल किंवा दक्षिण महाराष्ट्र येथें राष्ट्रकूटांचें राज्य टिकून होतें. याच सुमारास दक्षिणेंत बदामीच्या चालुक्यांचा उदय होत होता. या वंशांतील सुविख्यात राजा द्वितीय पुलकेशी यानें राष्ट्रकूटांशीं सख्य करून कल्चुरींचा पराभव केला व आपलें साम्राज्य नर्मदानदीपर्यंत पसरविलें. कर्नाटक ते गुजराथ हा आपल्या अंमलाखालील मुलुख सलग करण्याकरितां त्यानें आपला मित्र राष्ट्रकूटनृपति गोविंद याला विदर्भ देशाचें राज्य दिलें. त्यानें 'अचलपूर' (सध्यांचें उमरावती जिल्ह्यांतील एलिचपूर) येथें आपली राजधानी केली.

महाराष्ट्रांत चालुक्यांचें साम्राज्य आठव्या शतकाच्या मध्यापर्यंत टिकलें. चालुक्य हे मूळचे कर्नाटकांतील. तथापि त्यांच्या साम्राज्यांतील देशांत



अणुक्रमणिका

महाराष्ट्र हा प्रमुख असल्यानें ह्युएनत्संग या चिनी प्रवाश्यानें चालुक्यसम्राट् द्वितीय पुलकेशीस 'महाराष्ट्राधिपति' म्हटलें आहे. त्यानें चालुक्यांच्या राजधानीचें वर्णन केलें आहे. त्यावरून त्यांची एक राजधानी नाशकाच्या जवळपास असावी असें वाटतें. चालुक्यांच्या काळीं हिंदुधर्माला उत्तम राजाश्रय मिळाला व संस्कृत विद्या व स्थापत्य कला, चित्रकला इत्यादिकांस उत्तेजन मिळालें. अजंठ्याच्या लेण्यांतील कांहीं चित्रें चालुक्यांच्या काळचीं आहेत.

चालुक्यांचा इ. स. ७५० च्या सुमारास अस्त झाला. त्यानंतर अचलपूरच्या राष्ट्रकूटांनीं आपली सत्ता इतर देशांवर पसरविण्यास आरंभ केला. या वंशांतील तृतीय गोविंद यानें सबंध दक्षिण हिंदुस्थान पादाक्रांत करून उत्तरेंत स्वाऱ्या केल्या. ताम्रपटांतील याच्या उत्तर हिंदुस्थानांतील विजयांचें वर्णन वाचतांना अठराव्या शतकांत आपल्या स्वाऱ्यांनीं दिल्लीचें सिंहासन खिळखिळें करणाऱ्या मराठ्यांच्या पराक्रमाचें स्मरण होतें. तृतीय गोविंदानें आपली राजधानी 'मयूरखंडी' येथें नेली. ह्या स्थानाचा अद्यापि निश्चित पत्ता लागला नाहीं. तथापि ती चांदा जिल्ह्यांतील मार्कंडी असावी असा प्रस्तुत लेखकाचा तर्क आहे. मार्कंडी हें गांव वैनगंगानदीच्या तीरावर असून येथें ती नदी उत्तरवाहिनी होत असल्यामुळें पवित्र तीर्थ म्हणून गणलें गेलें आहे. येथें अप्रतिम शिल्पकाम केलेलें मार्कंडेश्वराचें देवालय आहे व अनेक शिलालेख अद्यापि विद्यमान आहेत.

तृतीय गोविंदाचा पुत्र पहिला अमोघवर्ष यानें 'मान्यखेट' (हल्लींचें निजामराज्यांतील मालखेड) हें नवीन नगर स्थापून तेथें आपली राजधानी नेली. याच्या काळीं अपभ्रंश व कन्नड भाषांना राजाश्रय मिळून त्यांमध्यें उत्कृष्ट ग्रंथरचना झाली. या वंशांत पुढेंही तृतीय इंद्रासारखे पराक्रमी राजे झाले. त्यांनीं अनेकदां उत्तरेंत स्वाऱ्या करून कनोजाधिपति प्रतीहार सम्राटांचा पराभव केला व उत्तर हिंदुस्थानांत आपला दरारा बसविला. इंद्र राजाच्या कनोजच्या स्वारीचें वर्णन ताम्रपटांत पुढील प्रकारें केलें आहे—

**यन्माद्यद्द्विपदन्तिदन्तविषमं कालप्रियप्राङ्गणं**
**तीर्णा यत्तुरगैरगाधयमुना सिन्धुप्रतिस्पर्धिनी।**
**येनेदं हि महोदयारिनगरं निर्मूलमुन्मूलितं**
**नाम्नाद्यापि जनैः कुशस्थलमिति ख्यातिं**
**परां नीयते॥**

भावार्थः—इंद्र नृपतीच्या मत्त हत्तींच्या दातांच्या आघातांनीं (काल्पी येथील) कालप्रिय (देवालया)चें अंगण उंचसखल झालें आहे. त्याच्या घोड्यांनीं सागराशीं (विस्तारांत) स्पर्धा करणारी अगाध यमुना नदी पार केली. त्यानें समूळ उद्ध्वस्त केलेलें हें शत्रूचें महोदय (कनोज) नगर अद्यापि (त्यांत वाढलेल्या गवतामुळें) कुशस्थल या नांवानें लोकांत विख्यात आहे.

मागील राजवटींतल्याप्रमाणें राष्ट्रकूटांच्याही अमदानींत कलादिकांना राजाश्रय मिळाला. या वंशांतील पहिला कृष्ण याच्याकाळीं वेरूळचें 'कैलास' नामक अप्रतिम शिल्प केलेलें लेणें कोरलें गेलें. त्याची जगांतील प्रमुख आश्चर्यांत गणना होतें. राष्ट्रकूटांच्या काळीं अपभ्रंश वाङ्मयाचीही अत्यंत अभिवृद्धि झाली. त्यांतील कांहीं उत्कृष्ट ग्रंथ अलीकडे प्रकाशित झाले आहेत.

राष्ट्रकूटानंतर पुनः चालुक्यांचा उदय झाला. याकाळीं त्यांची राजधानी 'निजामच्या राज्यांतलि कल्याण' येथें होती. या अवधींत धारच्या परमार राजांनीं नर्मदेच्या दक्षिणेस आपली सत्ता पसरविण्यास सुरवात केली. व लौकरच उत्तर महाराष्ट्र व विदर्भ आपल्या अंमलाखालीं आणलें. सुप्रसिद्ध परमार नृपति मुंज याच्याकाळीं गोदावरी नदी ही चालुक्य व परमार यांच्या राज्यांची सरहद्द झाली होती. पुढें लौकरच चालुक्यांनीं गोदावरीच्या उत्तरेचा मुलुख काबीज केला. या राजवंशांतही अनेक बलाढ्य राजे होऊन गेले. त्यामध्यें सहाव्या विक्रमादित्याचें नांव विख्यात आहे. यानें आपल्या नांवें एक शक स्थापला होता. याच्या दरबारीं विक्रमांक चरित्राचा कर्ता बिल्हण व मिताक्षरेचा कर्ता विज्ञानेश्वर हे संस्कृत पंडित होते.

इ. स. च्या बाराव्या शतकाच्या अखेरीस पुनः राज्यक्रांति होऊन चालुक्यांच्या साम्राज्याचा अस्त झाला व यादव नृपति उदयास आले. यापूर्वीही

यादव नाशिक जिल्ह्यांत राज्य करीत होते. पण ते मांडलिक म्हणून होते. सन ११७८ च्या सुमारास यादव नृपति भिल्लण यानें चालुक्यांच्या सेनापतीचा पराभव करून आपलें स्वातंत्र्य जाहीर केलें व 'देवगिरि' (हल्लींचें दौलताबाद) नगर स्थापून तेथें आपली राजधानी नेली. पुढें या वंशांत तैतुगी, सिंघण, कृष्ण, रामचंद्र यासारखे एकापेक्षां एक प्रतापी राजे उत्पन्न होऊन त्यांनीं नर्मदा व कावेरी या नद्यांमधला सर्व प्रदेश आपल्या अंमलाखालीं आणला. यांपैकीं कांहींनीं तर मथुरा व काशी या पुण्यक्षेत्रांपर्यंत स्वाऱ्या करून मुसलमानांचा पराभव केला. शेवटच्या रामचंद्र अथवा रामदेवराव यादव नृपतीनें काशींतून मुसलमानांना हांकून लावून तेथें शार्ङ्गपाणीचें (विष्णूचें) सुवर्ण मंदिर बांधलें असा अलीकडे पुरुषोत्तम-पुरी येथें सांपडलेल्या ताम्रपटांत उल्लेख आहे. या राजांच्या काळच्या शिलालेखांत तत्कालीन सेनापतींचीं नांवें व त्यांच्या पराक्रमाचीं वर्णनें आढळतात. त्यांमध्यें विदर्भांतील सेनापति खोलेश्वर हा विख्यात होता. हा मुद्गल-गोत्री ब्राह्मण असून शौर्याप्रमाणें औदार्याबद्दलही प्रसिद्ध होता. यानें वऱ्हाडांत पयोष्णी (पूर्णा), वरदा (वर्धा) वगैरे नद्यांच्या काठीं विद्वान् ब्राह्मणांना अग्रहार दिले व अचलपूर (एलिचपूर), आम्रपूर (आंबे) येथें देवालयें बांधलीं.

यादव नृपतींच्या काळीं संस्कृत व मराठी भाषांना उदार राजाश्रय मिळून त्या संपन्न झाल्या. भास्कराचार्यांसारखे ज्योतिषी, वोपदेवासारखे वैयाकरण व तत्त्वज्ञानी, हेमाद्रि पंडितांसारखे धर्म-शास्त्रकार व राजकार्यधुरंधर यांच्या ग्रंथनिर्मितींनें संस्कृत वाङ्मयांत बहुमोल भर पडली. याच कालांत मराठी भाषेलाही परिणतावस्था प्राप्त होऊन तिला मुकुंदराज व ज्ञानेश्वर यांनीं आपल्या ग्रंथ-रत्नांनीं सजविलें. महानुभावांच्या धर्माची स्थापनाही यादवराजवटींत होऊन त्यांचे संस्थापक गोविंदप्रभु, चक्रधर वगैरेंनीं महाराष्ट्र हेंच आपलें कार्यक्षेत्र केल्यानें मराठींत पद्यवाङ्मयाप्रमाणें उत्कृष्ट गद्य-वाङ्मयाचीहि निर्मिति झाली. याप्रमाणें शौर्य, औदार्य, विद्वत्ता, तत्त्वज्ञान, धार्मिकपणा इत्यादि गुणांमुळें महाराष्ट्राला पुनः अग्रेसरत्व मिळालें व त्याची कीर्ति सर्वत्र पसरली.

### संपन्न अवस्थेंत भावी विनाशाचीं बीजें

रामदेवराव यादवाच्या काळीं महाराष्ट्र संपन्नतेच्या शिखरावर पोंचला होता. पण त्यावेळींच भावी विनाशाचीं बीजें पेरलीं जात होतीं. रामदेवराव आपल्या चुलतभावास पदच्युत करून गादीवर आला होता. त्यानें आपल्या प्रतिस्पर्ध्यांस निष्ठुरतेनें वागविलेलें दिसतें. अलीकडे सांपडलेल्या पुरुषोत्तमपुरी ताम्रपटांत रामदेवरावाचा मंत्री पुरुषोत्तम याचें मन स्वामिद्रोह करणाऱ्यांविषयीं लोखंडाच्या कड्याप्रमाणें वक्र व कठोर होतें व त्याच्या प्रतापाग्नींत क्रूर लोक कांटेरी झाडांप्रमाणें जळून भस्म झाले व त्यायोगें त्यानें आपला स्वामी रामराजा याचें यश सुवर्णा-सारखें उज्ज्वल केलें, असें वर्णन आहे. त्यावरूनही रामदेवरावाच्या करड्या अंमलाची प्रतीति येते. महानुभाव पंथाचा प्रसार झाल्यामुळें जनतेंत चातुर्वर्ण्यविहित कर्मांच्या बाबतींत शैथिल्य उत्पन्न झालें होतें. तेंही त्यानें दूर केल्याचें वर्णन आहे. त्याच्या कारकीर्दींत महानुभावपंथीयांचा छळ झाल्याचे त्या पंथाच्या ग्रंथांत उल्लेख आहेत. या व इतर कारणांनीं जनतेमध्यें बेदिली उत्पन्न झाली होती. तशांत अधिकारी वर्गही विजयोन्मादांत बेसावध राहिल्यामुळें मूठभर परकीयांच्या आक्रमणास महाराष्ट्र बळी पडला व चौदाव्या शतकाच्या आरंभीं यादव राजवटीचा अस्त झाला.

महाराष्ट्राच्या प्राचीन इतिहासाच्या येथवरच्या धावत्या समालोचनावरून खिस्तपूर्व तिसऱ्या शतकाच्या अखेरीपासून खिस्तोत्तर तेराव्या शत-काच्या अंतापर्यंतच्या दीड हजार वर्षांच्या दीर्घ कालखंडांत महाराष्ट्रानें आपल्या शौर्य, औदार्य, विद्वत्ता, कलानैपुण्य इत्यादि गुणांनीं भारतीयेति-हासांत काय कामगिरी केली, हें दिसून येईल. महाराष्ट्राच्या या उज्ज्वल कीर्तींत विदर्भ, मुंबई इलाख्यांतील महाराष्ट्र व निजामच्या राज्यांतील मराठवाडा या तीनही प्रांतांचा वांटा आहे. कारण महाराष्ट्राच्या राजधान्या या सर्व प्रांतांत कालभिन्न-त्वानें होत्या. राजधानी असते त्या भागांतील लोक साहजिकपणें प्रामुख्यानें पुढें येतात. आतां पुनः महाराष्ट्र एक होण्याची वेळ आली आहे. या प्रसंगीं

[पान ५६ पहा.

# गवई पेशांतील पूर्वीची शागिर्दी

श्री. केशव वामन भोळे

हल्लीं मोठमोठ्या शहरांतून आपण संगीत विद्यालयांच्या पाट्या गल्लोगल्लीं वाचतों. पन्नासपाऊणशें वर्षांपूर्वी महाराष्ट्रांत मिरज–इचलकरंजी–पुणें, गुजराथेंत बडोदें, माळव्यांत इंदोर–उज्जयिनी, उत्तर हिंदुस्थानांत मुख्यतः— ग्वाल्हेर–दिल्ली–आग्रा–जयपूर–रामपूर–पतियाळा–लाहोर, पूर्वेकडे बनारस–लखनौ, वगैरे ठिकाणीं पाट्या नसलेल्या संगीतशाळा स्वतः गवयांनीं व त्यांच्या शिष्यांनीं चालविल्या होत्या. त्यांच्या गायकीच्या परम्परांना 'घराणीं' असें म्हणतात. गवयी लोक शिष्य स्वतः जवळच बाळगून असत. तो जर स्वजातीय असला, तर त्याचें रहाणें व जेवण–खाण बहुशः गुरुगृहींच होत असे. स्वजातीय नसल्यास व घरचा गरीब असल्यास त्याला माधुकरी मागावी लागे, कधीं अन्नछत्र पहावें लागे, किंवा संस्थानिकांच्या वाड्यांत श्रीमंतांच्या पङ्क्तीला हजर असावें लागे. या सर्व वेळा चुकल्या तर उपाशी रहाणें क्रमप्राप्तच होतें. त्या काळीं गवयांची शागिर्दी करून गाणें शिकणें म्हणजे सुळावरची पोळी होती. "मधुकरीसुद्धां पोटभर मिळत नसे. अशीच अर्धपोटी पांचसहा वर्षें काढलीं. ज्या दिवशीं मधुकरी पोटभर मिळत नसे, त्या दिवशीं अन्नछत्रांत जेवत असे. आमची त्या वेळची स्थिति म्हणजे काय? अंगभर कपडाहि नाहीं. धड पोटभर अन्नहि नाहीं. उत्तर हिंदुस्थानांत हिंवाळ्यांत थंडीच थंडी, तर उन्हाळ्यांत उष्णताच उष्णता! एकदां कां ती 'लूह' (गरम वारा) वाहूं लागली कीं सनस्ट्रोक होण्याचीच भीति! अशांत आमचे गुरु जातीचे मुसलमान! कांहीं दिवस नुसते रहून काढले मी. मला वाटूं लागलें कीं उगीच आपण घरदार व मातोश्रीस सोडून इकडे आलों. ग्वालेरींतील लोक म्हणत 'हा मुलगा वेडा होणार! लंगोटी घालून दिवसभर गांवांत फिरतो व ताना मारीत असतो.'" असें जें कै. वझेबुवा स्वतःसंबंधीं म्हणत असत, त्यावरून माझें वरील कटु विधान वाचकांस पटेल. थोडक्यांत म्हणजे आधीं गुरूची सेवा नंतर गाण्याचें शिक्षण, आणि शेवटीं पोटाची सोय! आधीं पोटोबा अन् मग विठोबा अशी परिस्थिति गरीब बिचाऱ्या शिष्यांच्या नशिबीं नव्हती.

## 'षड्जपंचमस्थिति'

सकाळीं गुरुजी उठण्याच्या आधींच शिष्यानें उठून स्वतःचा प्रातर्विधी–स्नान आटोपून मग गुरुजींना उठवावें. गुरुजी सकाळचा कार्यक्रम आटोपीत आहेत तोंपर्यंत बैठक वगैरे स्वच्छ घालून पिकदाणी 'लख्ख' घासून आणून ठेवावी. पिकदाणी जर कां स्वच्छ नसेल तर गुरुजींची 'तबियत' गरम होऊन, (तिचा पारा नेहमींच वर चढलेला असे) तीच शिष्याच्या अंगावर ते भिरकावित. तंबोरा साफ करून तो जुळवून गुरुजीसमोर ठेवून त्यांच्या पायांस स्पर्श करून वन्दन केल्यावर शिष्यानें 'बुटी' च्या व्यवस्थेस लागावयाचें. तोंपर्यंत गुरुजी पानाचा डबा खसकन् पुढें ओढून 'पान जमवीत.' बुटी म्हणजे भांगेची गोळी. ती चढविल्यावर तालमीला सुरुवात होई. तालीम घेत असलेला शिष्य स्वतः एक तंबोरा धरून तालीम घेई. त्या आधीच्या अवस्थेंतला शिष्य मुसताच दुसरा तंबोरा धरून त्या स्वरांत 'खर्ज भरी.' ज्या स्वरांत तंबोरा मिळविला असेल त्याच्या खालच्या

म्हणजे मंद्र सप्तकांतील पंचम व षड्ज स्वतःच्या गळ्यानें लावण्याच्या मेहनतीला 'खर्ज भरणें' म्हणतात. तंबोऱ्याची उजवीकडील शेवटची जाड तार याच स्वरांत मिळविलेली असते. हें चालूं असतांनाच गुरुजींची बुटी व पान जमलें कीं गुरुजींनीं तंबोऱ्याच्या स्वरामध्यें आपला स्वर मिळवून शिष्याला एकादी 'अस्ताई सांगण्यास' सुरुवात करावी. षड्जपंचमाच्या जागीं पूर्वस्थितींतल्या विद्यार्थ्यानें गुरुजींना साथ देण्याकरितां ते ते स्वरच गळ्यानें लावावे, आणि गुरुशिष्यांच्या अस्ताई–अंत्र्याचें नुसतें श्रवण करावें. त्यानें गाण्याचा यत्किंचित्‌हि प्रयत्न करूं नये. श्रवणानें 'कान तयार करणें' व अनेक अस्ताई–अन्त्रे, त्यांची नायकी व गायकी यांची मनांत नोंद करणें एवढेंच त्याचें काम ! त्यानें फक्त कान उघडे ठेवायचे. तोंड असून बोलायचें नाहीं, गळा असून षड्जपंचमाशिवाय कांहींहि गावयाचें नाहीं.

## खाष्ट गुरुपत्नी

या षड्जपंचमस्थितींतल्याहि आधींच्या प्रथमावस्थेंतला विद्यार्थी गुरुजींच्या घरांतली बाजारहाटासारखीं कामें करी, स्वयंपाकघरांत गुरु पत्नीच्या हाताखालीं राबून गुरुजींच्या स्नानसंध्यापूजेची तयारी ठेवी. गुरुजींचें जेवण होत आहे तों त्यांचें धोतर व पंचा बडवून, त्यांच्या शिस्तवार चापचोपून घड्या पाडून, त्या दांडीवर वाळत टाकी. किञ्चित् गुलाबी छटा पडलेल्या धोतराकडे पाहून गुरुजींच्या तबियतेची कळी जरा खुलावी व त्यांनीं आपल्या हातीं लवकर तंबोरा द्यावा अशी सुप्त इच्छा या खटपटीच्या सेवेमागें असे. सेवेनें गुरुजींची मर्जी सुप्रसन्न करणें हा एकच राजमार्ग त्या काळच्या गरीब शिष्यांना मोकळा होता. संध्याकाळीं गुरुजींकरितां भांग घोटणें, त्याची बुटी तयार करणें हीं कामें असत. रात्रीं गुरुजींचें 'पाय चेपणें' हें सर्वांत महत्त्वाचें काम असे. गुरुजींचा डोळा लागण्याआधीं शिष्याचा डोळा लागल्यास हात सैल पडत आणि मग एखादी झणझणीत चपराक शिष्याच्या गालावर बसे. ही शागिर्दी चालूं असतांना येतां जातां गुरुजींच्या गळ्यांतून आलेले कांहीं अस्ताई–अंत्रे बिचाऱ्याच्या कानाला चाटून जात, तर कांहीं कानावरून जात. त्यामुळें त्याची संगीताची जिज्ञासा किंवा आवड वाढली तरच ती पुढच्या शिक्षणाकरितां गुरुगृहीं टिके; नाहींतर संगीतलहरीप्रमाणें त्या दारिद्र्याचे मनोरथ हवेंतच विरून जात. गुरुपत्नी सुस्वभावी असल्यास ठीक. जर का ती बाळकृष्णबुवा इचलकरंजीकरांच्या गुरुपत्नीसारखी खाष्ट चण्डिका असेल तर त्या शागीर्दाचें पुरें दुर्दैवच ओढवे. अनेक हालअपेष्टा व निराशेचे प्रसंग सोसून बाळकृष्णबुवा धारेस देवजीबुवा परांजपे या अष्टपैलू महाराष्ट्रीय गवयाकडे शिकण्यास राहिले. तेव्हां ही कजाग बाई ऐन तालमीच्या वेळेस बाळकृष्णबुवांना लांबचें काम सांगे. कधीं त्यांतूनहि सवड काढून बुवा तंबोऱ्यावर हात टाकून 'आ' करीत आहेत, तोंच शिष्यांची सरवत्ती सुरूं करून ही बाई त्यांस मध्येंच उठवी. मग देवजीबुवांनीं सायंकाळीं देवदर्शनाच्या निमित्तानें बाळकृष्णबुवांना गांवाबाहेर नेऊन तालीम द्यावी. "घरीं तालीम सुरूं झाली कीं, त्यांनीं (बाईनीं) येऊन तंबोऱ्याची तार धरावी, नाहींतर गुरुजींचें तोंड तरी धरावें. म्हणजे अर्थात् गाणें बंद होई. पण तो सर्व निमुटपणें सहन करून राहिला होता. एक दिवस गुरुमातेच्या रागाचा पारा इतका चढला कीं, त्या हातांत पेटलेला काकडा घेऊन आल्या व बाळकृष्णाचे अंगावर कडाडल्या, 'मेल्या, माझ्या घराबाहेर होतोस कीं घर पेटवूं ?'' (बाळकृष्णबुवा इचलकरंजीकर यांचें चरित्र. पानें–१५।१६. लेखक– केशव गुंडो इंगळे) बिचारे बुवा गुरुजींची परवानगी घेऊन निघाले.

## "और जोरसे"

चरणसेवेविषयीं कै. वझेबुवा आपले उस्ताद निसारहुसेन यांची मनोरंजक गोष्ट सांगत. अफू खाऊन खांसाहेब पडले कीं या 'रामकिसन'ला आपले पाय व अंग रगडावयास सांगत. तास–न्–तास अंग रगडून बुवांचा हात ज़रा सैल पडला तर खांसाहेब "और जोरसे" म्हणून ओरडत. दमलेल्या बुवांना एके दिवशीं त्याहि अडचणींत एक नामी युक्ति सुचली. त्यांनीं एक लाकडी थापटणें तयार केलें. खांसाहेब जरा अफूच्या तारेंत आले कीं बुवा हळूंच थापटणें बाहेर काढीत व अंग थापटायला सुरवात करीत. तेव्हां श्रमहि कमी होऊन खांसाहेबहि खुष होत. शेवटपर्यंत या अस्त्राचा



अणुक्रमणिका

खांसाहेबांना पत्ता लागला नव्हता. शिष्य हरहुन्नरी असला तर अशा आपत्तींतून मार्ग काढून गुरुजींची मर्जी संपादी. कै. वझेबुवांच्याहि पूर्वी बाळकृष्ण-बुवांनीं आपल्या गुरूजींस सेवेनेंच खुष करून विद्या कशी प्राप्त करून घेतली याची समग्र माहिती त्यांच्या चरित्रांतूनच पुढील परिच्छेदामध्यें देत आहे.

## बाळकृष्णबुवांची गुरुसेवा

बुवांनीं काशीस जोशीबुवांच्या बिऱ्हाडीं जाऊन भेट होतांच व त्यांना नमस्कार करतांच 'तूं इतके दिवस येथेंच आहेस काय?' वगैरे बद्दल त्याची चौकशी केली व 'बरें झालें तूं आलास, एवढी बुटी तयार कर' असें सांगितलें. "बाळकृष्णबुवास गुरूस कसें खूष करावें हें चांगलें माहित असल्यामें त्यानें आपल्याबरोबरच भांगेची गोळी आणली होती; त्यामुळें जोशीबुवांना बरें वाटलें. नंतर थोड्या वेळानें तंबोरी काढून त्यांनीं ती स्वतः जुळविली व............'श्रीरामा, लवकर तारी' हें पद शिकविलें............काशीस सुमारें पंधरा दिवस जोशीबुवांचा मुक्काम होता. त्या मुदतींत त्यांना रोज बुटी तयार करून देणें, त्यांचिबरोबर नित्य देवदर्शनास जाणें, वाटेंत तंबाखू वगैरे खावयाची म्हटल्यास लगेच पानपट्टी तयार करून देणें, लघुशंकेस बसावयाचें म्हणतांच बरोबर असलेल्या रस्सीलोट्यानें आसपासच्या विहिरींतून पाणी आणून देणें वगैरे कामें बाळकृष्ण चोख रीतीनें करीत असे. जोशीबुवा रोज गंगेवर संध्या करावयास जावयाचे त्यावेळीं, बाळ-कृष्णाहि बरोबर असे. याप्रमाणें संध्या वगैरे आटोपून दोघेहि जोशीबुवांचे घरीं येत व मग बाळकृष्ण आपल्या घरीं जाई. पुढें त्यानें रात्रीचा मुक्काम त्यांच्याच घरीं ठेविला. अशा रीतीनें त्यानें पंधरा दिवस इतकी उत्तम गुरुसेवा केली कीं गुरुजी खुष होऊन 'तुला फार उत्तम सेवा करतां येते, मी तुझ्यावर खुष आहे' असें त्यांनीं बाळकृष्णास बोलावून सांगितलें. त्यानेंहि नम्रपणें उत्तर दिलें कीं, 'माझे वडील गवई होते व ते आपल्या गुरुजींची सेवा कशी करीत तें केव्हां तरी सांगत. म्हणून सेवा कशी करावी हें मला माहीत आहे. पण मी विशेष असें कांहींच केलें नाहीं.' याप्रमाणें या पंधरा दिवसांत या गुरुशिष्यांचीं मनें चांगली जुळलीं व बाळकृष्णास चार-पांच चिजाहि मिळाल्या." पुढें काशीला स्वतः गाण्याच्या जोरावर दीडशें रुपये मिळवून बाळकृष्णबुवा ग्वाल्हेरीस बुवांच्या मागोमाग गेले. व ते गुरुजींच्या चरणावर ठेवून त्यांना अर्पण केले. बुवांनीं खुष होऊन तालीम मनापासून देण्यास सुरुवात केली. "गुरुजी त्यास सकाळीं चार तास शिकवीत व नंतर स्नानास जात. त्यावेळीं जोशीबुवांच्या इतर शिष्यमंडळींना तो एक तास तालीम देई.........नंतर तो ठराविक तीन चार ठिकाणीं मधुकरीस जाई. व तेवढ्यावर त्याचा चरितार्थ भागत असे." या प्रमाणें एकसारखा सहा वर्षे क्रम चालला होता. पुढें कांहीं वर्षांनीं बाळकृष्णबुवा गुरुजींच्या परवानगीनें हदूखांचे चिरंजीव महंमदखां यांच्याजवळ वर्षभर फिरतीस हिंडत असतां बडोद्यास आले. येथील मुक्कामांत खांसाहेबांच्या बरोबरहि त्यांची वागणूक शिष्यासारखीच किती निष्ठापूर्ण असे, हें पुढील उताऱ्या-वरून दिसून येईल. "रोज पहाटे स्नान करून, खांसाहेब निजून उठायाच्या आंत त्यांच्या घरीं जाऊन तंबोरा काढून गाण्यास सुरुवात करावी. गाणें सुरू झालें म्हणजे मग खांसाहेब निजून उठत व प्रातर्विधि आटोपून तेहि गाण्यास येऊन बसत. ही तालीम दुपारीं अकरा वाजेपर्यंत चाले.........सायंकाळीं सहा वाजतां तालीम सुरू झाली म्हणजे रात्रीं अकरा वाजतां बंद होई व नंतर बाळकृष्णबुवा रात्रीं घरीं येऊन जेवीत असत. याप्रमाणें दिवसां-तून सुमारें दहा-अकरा तास त्यांची गाण्याची कसरत होत असे. असा एक वर्ष कार्यक्रम सुरू होता." (बाळकृष्णबुवांचें चरित्र)

## "गुरु बिन कैसे गुन आवे"

या शागिर्दींतून तावून सुलाखून जर हा शिष्य बाहेर पडला तर त्याच्या सेवेवर खूष होऊन गुरुजी त्याच्या हातीं तंबोरा देत. अर्थात् घरांतील त्याचीं वरीचरशीं कामें कमी होऊन तीं दुसऱ्या नवीन शिष्याच्या माथीं बसत. तंबोरा हातीं आल्यावर षड्जपंचम खर्ज भरून 'आवाज साफ झाला' कीं गुरुजी त्याला बहुशः यमनांतील (कल्याणांतील) एकादी 'सरगम' सुरवातीला सांगून मग अस्ताई—अंत्रा दाखवीत. हा अस्ताई अन्त्रा पूर्व परंपरागत



अणुक्रमणिका

आलेल्या घराण्याच्या पद्धतीनेंच म्हणवून घेत. त्यांत केसभरहि फरक झालेला खपत नसे. त्या-अस्ताई अन्त्याच्या तालाच्या जागा, त्यांचा उठाव ठरलेल्या जागीं असे. मोठ्या ख्यालाच्या अस्ताई अन्त्याची लय अतिशय धीमी असे. ती बहुशः ख्यालाच्या पुढीलपैकीं कोणत्या तरी तालांत बांधलेली असे. मोठ्या ख्यालचे ताल म्हटले म्हणजे तिलवाडा, आडा चौताल, झूमरा, अध्धा, एकताल, झपताल, तेवरा (किंवा रूपक) हे होत. तालाच्या वजनाप्रमाणें चिजांच्या स्वरयुक्त बोलांची बांधणी असे. अस्ताई अन्त्रा घराण्याच्या खास तालमीवरहुकुमच म्हटला जाण्याची आग्रही शिस्त असे. त्यांत त्यानें स्वतःच्या अकलेनें एकादीहि मुरकी, खट्का अगर गमक घालावयाचें नसे. या पद्धतीमुळें घराण्याची परम्परागत अशी खास गुरुमुखांतून आलेली नायकी शुद्धस्वरूपांत राही व रागहि शुद्ध राहून नुसत्या अस्ताई-अन्त्याच्या म्हणण्यांतच रागाचें स्वरूप स्पष्ट होऊन त्याची मूर्ति समोर उभी राही. शिष्यांच्या मनावर या बंदिस्त चिजांमुळें रागांच्या स्पष्ट प्रतिमा उमटून त्या रागांतील नवीन चिजा इतरत्र कोठें ऐकल्यास या प्रतिमाशीं त्यांचें स्वरूप न कळत ताडून पाहून ते रागाचें निदान तत्काल करीत. गुरु जर शास्त्र जाणणारा असला तर रागाचे आरोहावरोह वर्ज्यावर्ज्य, वादीसंवादी, त्यांचें चलन, इतर जवळ-पासच्या रागापासून त्यांचे स्वरूप कसें विभिन्न ठेवावयाचें याची माहिती देई. पण असें क्वचितच होई. शिष्यानें माहिती विचारणें, शंका काढणें (हल्लीच्या पद्धतीप्रमाणें) म्हणजे गुरुजींचा उपमर्द करण्यासारखेंच मानलें जाई. चिजांचे बोलसुद्धां लिहून घेऊन पाठ केले जात नसत. गुरुजींच्या किंवा खांसाहेबांच्या मुखांतून जें बाहेर पडेल तें ऐकूनच ध्यानांत ठेवून म्हणावयाचें अशी पद्धति होती. 'गुरुबिन कैसे गुन आवे' हीच समजूत त्या काळीं रूढ होती. संस्कृत शिकलेले वझेबुवांचे गुरु निसारहुसेनखां सुद्धां, बुवा जर स्मरणवहींत चिजा किंवा 'सरगम' लिहूं लागले, तर म्हणावयाचे, "अबे, लिखनेसे विद्या नहीं आती. तुम्हारे बापदादा क्या लिखते थे तो तू लिखने बैठा है! बड़ा आया लिखनेवाला!" लक्षपूर्वक श्रवणानेंच व गुरूच्या शिकविण्यानें विद्यार्थी तयार होत असत. अर्थात् त्याला बुद्धि, ग्राहकशक्ति, चिकाटी इत्यादि गुणांची जोड असल्यास विद्यार्थी लवकर तयार होई व दुसऱ्या बरोबरीच्या किंवा नवीन विद्यार्थ्यांना शिकवून आपलें ज्ञान नक्की करी व वाढवी.

## यमनाची तालीम

यमनाचीच तालीम सहासहा महिने, वर्षभर चाले. त्याकाळीं निदान मुसलमान उस्तादांची तरी ठाम समजूत होती कीं शागिर्दानें जर कां 'ऐमन' साल दोन साल खांसाहेबांच्या संगतींत पिसला तर बाकीचे राग त्याच्या गळ्यावर लवकर चढलेच पाहिजेत; आणि त्याप्रमाणें ते तालीम देतहि. चाळीस वर्षांपूर्वींच्या मुंबईतील अग्रेसर गायिका श्री. अंजनीबाई मालपेकरांनीं मला हेंच सांगितलें. "नजरखांनीं माझ्याकडून यमन वर्षभर गाऊन घेतला आणि नंतर इतर रागांची तालीम दिली. त्यामुळें आवाज सुरेल होण्यास तर खूप मदत झालीच; पण बाकीचे राग लवकर येऊं लागले." हा अनुभवाचा ठोकताळा विचार करण्यासारखा आहे.

## गोविंदराव टेंबे यांचा अनुभव

गळा तयार करण्यास गुरुजी स्वरांचे 'पलटे' घोटण्यास पहाटे व रात्रीं विद्यार्थ्याला बसवीत. पलटे म्हणजे स्वरसमूह. पलटे निरनिराळ्या रागांच्या नियमानुसारच बांधलेले असत. हे आलाप अंगानें व तानेच्या अंगानें म्हटले जात. पलटे घोटल्यानें गळा साफ, सुरेल, जिल्हईदार होऊन गातांना विस्तार करते वेळीं गळ्यांतून आलाप, हरकती, ताना घोटलेल्या पलट्यांच्या पूर्वपरिचयानें व संवयीनें सहज निघतात हा मुळीं त्यांचा अनुभवच! अजून-सुद्धां ही पद्धत पंढरपूरकरबुवांप्रमाणें कांहीं गवई चालवीत आहेत. पलटे घोकून गळा मोकळा करण्या विषयीं त्या काळीं कंटाळा करणारे व चोरट्या आवाजानें गाणारे गोविंदराव टेंबेहि पलटे घोकल्या-मुळें आपला गळा 'खुला' झाल्याची महत्त्वाची माहिती "माझा व्यासंग" मध्यें देतात. "त्यांच्या (म्हणजे भास्करबुवांच्या) इतक्या भाषेनंतर मी कांहीं तानपलटे घोकण्याचा परिपाठ ठेवला...

या घोकंपट्टीचा पुढें मला चांगलाच उपयोग झाला. चोरट्या गळ्यानें गाण्याची संवय हळुंहळूं कमी होऊं लागली, व खुला आवाज लावतांना वाटत असलेला संकोच कमी होऊं लागला. '' ( पान ११७ )

## नायकीचे साचे

प्रत्येक घराण्याची अस्ताई–अंन्यार्शी निगडित असलेली पूर्वपरंपरागत आलेली नायकी शिष्याच्या गळीं उतरविल्याशिवाय त्याला घराणेदार गवई आपली गायकी देत नसत. नायकीचे शिस्तवार क्रमबद्ध साचे असत. काल म्हणवून घेतलेला पाठ आज जसाच्या तसाच पुनः म्हणवून घेतां आला पाहिजे. अशी ग्वाल्हेर घराण्याची पद्धत असे. याबद्दल बाळकृष्णबुवांनीं पुण्याचे अंधविद्वान् सदाशिवशास्त्री भिडे यांच्याजवळ पुढील उद्गार काढले होते. " गवई लोक गाणें शिकवीत नाहींत...... याचें कारण त्यांची कुचराई नसून त्यांना शिकवितां येत नाहीं हेंच खरें. आमच्या गाण्याचा सांचा ठराविक व घोटीव आहे. आज एक जागा ( तान ) शिष्याला शिकविली तर दुसरें दिवशीं तीच जागा शिष्याला बिनचूक शिकवितां आली पाहिजे. परंतु ज्यानें आपल्या घराण्याची शिस्त घोटीव केलेली नसते, त्याला त्याच त्याच ताना बिनचूक घेतां येत नाहींत. मी आज एक तान शिकविली आणि वर्षेसहामहिन्यांनीं तुम्ही मला तीच तान ध्यावयास सांगितली तर मी ती तशीच बिनचूक गावून दाखवीन. याचें कारण हद्दू व हसूखांच्या घराण्यांत प्रत्येक रागांतील ख्यालाच्या सर्व अंगांचे सांचे शिस्तवार आहेत. तेवढे तयार झाले म्हणजे या गायकीची शिस्त धरून विस्तार करण्यास वाटेल तितकी मोकळीक असते. '' ( बाळकृष्णबुवा यांचें चरित्र– पान ६८ )

## जोशीबुवांना धन्य वाटलें !

बुवांच्या वरील उद्गाराप्रमाणें प्रत्येक रागाच्या सर्व अंगांच्या शिस्तवार सांच्यांत कसरतीनें 'नायकींत' तयार झालेल्या विद्यार्थ्याला गुरुजी आपल्याबरोबर गावयाला बसतेवेळीं साथीला बसवीत. तेथें नायकीबरोबरच गुरुजींच्या 'गायकीचें' श्रवण होऊन तो स्वतः ' गाऊं लागण्याचा ' प्रयत्न करी. आत्मसात् केलेल्या नायकीच्या आधारानें उभा राहिल्यावर आपल्या गायकीच्या आधारानें चार पावलें टाकण्याचा आत्मविश्वास आल्यावरच शिष्याला भर मैफलींत आपल्या साथीला ते घेत व मधून मधून स्वतः थांबून त्याला गावयाला ' मोकळा सोडीत.' हुशार व अशा संधीची वाटच पहाणारा विद्यार्थी तिचा फायदा घेऊन गायकींत ' गळा फिरविण्याचा' जरूर प्रयत्न करी व गुरुजींची व श्रोत्यांची वाहवाहि घेई. हळूंहळूं धीर चेपल्यावर तो गुरुजींची सतत ऐकत असलेली गायकी सहीसही आपल्या गळ्यांतून उतरवून 'जणूं काय गुरुजीच गात आहेत' असा भास ऐकणारांत निर्माण करी. ग्वाल्हेरला एकदां जोशीबुवांनीं स्वतः ऐवजीं बाळकृष्णबुवांना मुद्दामच एके ठिकाणीं गावयास पाठविलें होतें. तेथील हकीगत बाळकृष्णबुवांच्याच शब्दांत देतों. " ग्वाल्हेरास वसंतपञ्चमीचा उत्सव चांगला साजरा करितात. मोठमोठ्या गवयांचीं गाणींबजावणीं लोक मोठ्या हौसेनें करीत असतात. अशा एका प्रसंगीं जोशीबुवांच्याकडे दोन ठिकाणच्या गाण्याचें निमंत्रण आलें. तेव्हां एकीकडे आपण स्वतः जाण्याचें ठरवून दुसरीकडे बाळकृष्णास पाठविण्याचें त्यांनीं योजिलें. यावेळीं बाळकृष्ण चांगला तयार झाला असल्यानें आपलें नांव गमावणार नाहीं अशी त्यांना पक्की खात्री होती.........त्या दिवशीं जोशीबुवांचें गाणें लवकर आटोपल्यामुळें बाळकृष्णाचें गाणें कसें काय चाललें आहे हें सहज जातांजातां ऐकून जावें म्हणून, ज्या घरीं त्याचें गाणें होतें, तेथें ते आले. गाणें माडीवर चालूं होतें त्या ठिकाणीं खूप गर्दी झाल्यानें बरीच मंडळी रस्त्यावर ऐकत उभी होती. जोशीबुवाहि तेथें एका बाजूस गाणें ऐकत उभे राहिले. त्या दिवशीं बाळकृष्ण मनापासून व खूप तयारीनें गात होता. त्यानें आपल्या गुरुजींची गायकीची पद्धत इतकी हुबेहुब उचलली होती कीं, रस्त्यावरील लोकांना जोशीबुवाच गात आहेत असें वाटून ' आज जोशीबुवा खूप जुळले आहेत ' असें ते आपआपसांत बोलत होते. हे त्यांचे शब्द ऐकून जोशीबुवांना धन्यता वाटली व ते घरीं निघून गेले. ( बाळकृष्णबुवांचें चरित्र पानें २६–२७ )

## " दुसरें गाडगें तयार करूं "

नायकी-गायकींत तयार झालेल्या शिष्याला बरोबर घेऊन गवयी चरितार्थसाधनासाठीं मुलुखगिरीस निघत. विद्यार्थ्याला गुरुजीबरोबर मैफलींत नाना-तऱ्हेच्या श्रोत्यांसमोर गाण्याचा अभ्यास होऊन अनुभव मिळे व त्याची दृष्टि व्यावहारिक होई. आपल्या कलेचा व ज्ञानाचा उपयोग कोठें कसा करतां येईल व विविध अभिरुचींच्या श्रोत्यांना आपणास खुष कसें ठेवतां येईल याचें प्रत्यक्ष शिक्षणच त्याला या प्रवासांतील मैफलींत मिळे. गुरुजींकडून एकाच रागांतील अनेक अस्ताई-अंत्रे, तराणे मिळून तो 'भरतीदार' होई. घराण्यांतील इतर गायकांकडून चिजा मिळवून त्यांचा संग्रह तो करी. असे शिष्य एके ठिकाणीं जमले म्हणजे एकेक रागांच्या ' चौकड्या ' कोणाला किती येतात याची एकमेकांत पूसतपास होई. चौकड्या म्हणजे चिजा. एकाच रागांतील निरनिराळ्या स्वरांवर उठाव असलेल्या, सम ठेवलेल्या अनवट चिजांची एकमेकांत देवाणघेवाण होई. सर्वांचें ज्ञान वाढे, चिजांचा संग्रह वाढे व घराण्याच्या गायकीबद्दल अभिमानहि वाढे. आठवड्यांतून एक दिवशीं म्हणजे गुरुवारीं, येत असलेल्या सर्व अस्ताई-अन्त्यांची उजळणी विद्यार्थ्यांकडून करून घेत. बाळकृष्णबुवांचा हा नियम असे व स्वतःच्या बाबतींत हा नियम त्यांनीं मरेपर्यंत पाळला. या उजळणीमुळें ज्ञान ताजें राही व चिजांमध्येंहि बिघाड होत नसे. चुकून कोणाचा झाल्यास चिजांची दुरुस्ती होई. या प्रमाणें श्रवण, मनन, चिन्तन व निदिध्यास या सर्व अवस्थांमधून शागिर्द गेल्यावर घराण्याच्या नायकी-गायकींत तरबेज झालेला शिष्य गुरुजींची परवानगी घेऊन स्वतः गुरुदक्षिणेचा पैसा मिळविण्याकरितां बाहेर जाई. स्वतन्त्रपणें बैठकींत गाऊन मिळविलेला पैसा आणून गुरुचरणावर भक्तिभावानें अर्पण करी व गुरूचा आशिर्वाद घेऊन 'बुवा' होऊन बाहेर पडे. स्वतंत्र झाल्यावरसुद्धां वारंवार पत्ररूपानें, कधींमधीं समक्ष, गुरुजींची भेट घेऊन त्यांचा परामर्ष घेऊन त्यांच्या सांसारिक अडचणी भागविणें हें शिष्याचें कर्तव्य तो भक्तिभावनेनें करी. क्वचित् कालीं गुरुजींची परवानगी घेतल्याशिवाय उतावीळपणाच्या भरांत विष्णुबुवा पलुस्करासारखा एकादा शिष्य बाहेर पडे. गुंडुबुवा इंगळे बाळकृष्णबुवांची परवानगी घेऊन औन्धास गेल्यावर आपणहि पैसा व लौकिक मिळवावा असें विष्णुबुवांना फार वाटूं लागलें व तशी त्यांची चुळबुळ सुरू झाली. गुरुजी मिरजेहून इचलकरंजीस गेल्याचें निमित्त साधून विष्णुबुवांनीं लाहोरची वाट धरली ( २२ ऑगस्ट १८९६ ). ही हकीगत बाळकृष्णबुवांच्या कानीं गेल्यावर त्यांना फार वाईट वाटलें व रागाच्या भरांत त्यांनीं इचलकरंजीकर बाबासाहेब घोरपडे यांच्याजवळ पुढील उद्गार काढले " आमचा धंदा कुंभाराचा. एक गाडगें हातीं लागलें नाहीं तर दुसरें तयार करूं."

## गुरुसेवा हीच गुरुदक्षिणा

गुरूची सेवा करून त्यांना खुष करण्याच्या राजमार्गानेंच विद्या प्राप्त करून घ्यावयाची रूढि त्या काळीं प्रचलित असे. खुष झाल्यावर विद्या दिली नाहीं असें क्वचितच. एकप्रकारें विद्यार्थ्यांची कसोटी पहाण्यासारखाच हा प्रकार होता. शिष्य श्रीमंत असो वा गरीब असो, सेवा ही त्यानें केलीच पाहिजे. तींत कोणतेंहि काम हलकेंसलकें न समजतां तें केलेंच पाहिजे असा कटाक्ष असे. बाळकृष्णबुवांच्याकडे " एकदां एक संपन्न स्थितींतील शिष्य बुवांच्या घरच्या पाण्याचा हौद नेत असतां त्याच्या नातलगाच्या दृष्टीस पडला. त्यावर त्या शिष्याच्या नातलगांनीं संतापून त्याला बुवांच्या घरीं जाण्यास बंदी केली व एक दिवस बुवांच्या घरीं जाऊन त्यांचा खरपुस समाचारहि घेतला. त्यावर बुवा त्यांना म्हणाले, ' तुमची वासनांतली मुलें वासनांतच नीट जपून ठेवा. बाहेरची हवा त्यांना दाखवलींत कीं थंडीवारा सोसण्याचे प्रसंग त्यांना वेळोवेळीं येणारच. उच्च विद्या हवी ना ? मग हलकीं कामें करण्याबद्दल खंती कां वाटावी ? चिखल व गढूळ पाणी तुडवून गेल्याशिवाय कांहीं कमळ कोणाच्या हातीं येत नाहीं. आमच्याबद्दल इतका ओरडा करतां पण आम्ही गुरुपरम्परेच्या उलट थोडेंच वागतों आहोंत ? आम्हाला आमच्या गुरूच्या घरीं रोज पिकदाण्या तर धुवाव्या लागतच पण त्याचाहि पलीकडचीं कित्येक हलकीं कामें आम्हाला वेळेनुसार करावीं लागलीं आहेत. गुरु-परम्पराप्रमाणें आमच्या घरीं हलकींसलकीं कामें

करूनच आमचा विष्णु, गुंडु व अन्तु हे आज नामांकित गवई म्हणून गाजताहेत. सांदीपनीच्या घरीं भगवान श्रीकृष्णालाहि काष्ठाचे भारे वहावे लागत ही गोष्ट तुम्हास माहीत आहे ना ?.........गुरूची सेवा करणें हाच आमच्या परम्परेप्रमाणें विद्यादानाचा मोबदला आम्हीं समजतों. हीच आमची फी व आमची गुरुदक्षिणा ! शिकून झाल्यावर आम्हास कोणीकोणी गुरुदक्षिणाहि देतात. पण ती त्यांच्या सदिच्छेचा प्रश्न असतो. त्याबद्दल आमचा लेखी करार मुळींच नसतो.'' बाळकृष्णबुवाप्रमाणेंच महाराष्ट्रांतून बाहेर विद्यार्जनासाठीं गेलेल्या वझेबुवा, भास्करबुवा वगैरे नामांकित गवयांनींहि आपल्या मुसलमान उस्तादांची सेवा करून त्यांना खुष करूनच विद्या मिळविली. गवयांप्रमाणेंच वादक व नर्तकांचाहि हाच इतिहास आहे.

### निर्भेळपणाबद्दल कटाक्ष

घराण्याच्या नायकी–गायकींत पक्केपणीं मुरेपर्यंत शागीर्दाला आणखी एक नियम कठोरपणें पाळावा लागत असे. आपल्या घराण्याखेरीज परघराण्यांतील गायकांचें गाणें त्यानें गुरु सांगेपर्यंत मुळींच ऐकावयाचें नाहीं—हा तो नियम. एकच तऱ्हा शागिर्दाच्या कानावर सतत पडावी, तीच त्यानें उचलून गळ्यांतून सहीसही काढून तिचें स्वरूप विशुद्ध ठेवावें, तीच गावी, तींत भेसळ होऊं देऊं नये, दुसऱ्या परक्या तऱ्हा तींत घुसूं देऊं नये, एवढाच प्रामाणिक हेतु त्यांत मुळांत होता. या पद्धतीमुळें विद्यार्थ्यांच्या मनांतहि गोंधळ होत नसे. अनेक गायकींची खिचडी होत नसे. एकाच संप्रदायावर सर्व बौद्धिकशक्ति केन्द्रित करतां येई. कालाचा व श्रमाचाहि अपव्यय टळत असे. गुरुमुखानेंच गाणें शिकावें व तें स्वतः मुखानेंच आपल्या शिष्याला द्यावें अशी परम्परा असल्यामुळें स्मरणशक्ति, सतत पाठान्तर, भेसळ टाळणें इत्यादि गुणांवरच गायनांतील अनेक बान्या, संप्रदाय, घराणीं वर्षानुवर्षें कालाच्या प्रवाहांत अबाधित टिकून राहिलीं. तींत भर पडली असली तरीं मूळ प्रकृतीला धरूनच, तिच्याशीं पूर्णपणें फटकून नव्हे.

---

## प्राचीन महाराष्ट्र व त्याच्या राजधान्या

पान ४९ वरून ]

आपसांतले भेदभाव विसरून सर्वांनीं महाराष्ट्रएकीकरणास मदत केली पाहिजे. अखिल महाराष्ट्र एक होऊन त्याच्या विविध क्षेत्रांतील कामगिरीनें भारताच्या कीर्तींत भर पडो, असें इच्छून हा लांबलेला लेख पुरा करतों.

---

# युद्धकालीन नियंत्रणें व युद्धोत्तर योजना

प्रा. ध. रा. गाडगीळ, एम्. ए. एम्. लिट् ( केंब्रिज )

स्वतंत्र हिंदुस्थानांत कोणतें आर्थिक धोरण आंखलें जाणार हा प्रश्न आज प्रामुख्यानें सर्वांपुढें उभा आहे. या प्रश्नाचें उत्तर अर्थात्, राज्यकर्ते कोणत्या वर्गांतील व कोणत्या योग्यतेचे आहेत, यावर अवलंबून राहणार. बहुतेक राजकीय पुढाऱ्यांनीं आजवर केलेल्या निवेदनांत वेळोवेळीं शेतकरी-कामगारांचें राहणीचें मान वाढविणें हा सरकारी धोरणाचा मुख्य उद्देश असल्याचें सांगितलें आहे. मध्यवर्ती व प्रांतिक सरकारांच्या गेल्या वर्षांतील कारभारामुळें या दिशेनें फारशी प्रगति झाली नसली तरी सामान्य जनतेच्या राहणीचें मान वाढविण्यास आर्थिक नियोजन आवश्यक आहे, हें निर्विवाद आहे. नियोजनासाठीं नियंत्रणाचा उपयोग केला पाहिजे. म्हणून युद्धकालीन नियंत्रणाचा या कामीं कितपत व कसा उपयोग करतां येईल, हा विचार आज महत्त्वाचा ठरतो.

## पूर्वतयारीचा अभाव

युद्धकालीन नियंत्रणाचा सुरवातीचा इतिहास बहुतेकांच्या स्मरणांत असेलच. हिंदुस्थानांतील युद्धकालीन नियंत्रणाचें मुख्य वैशिष्ट्य हेंच कीं, त्याची निर्मिति व प्रगति हीं इतर देशांच्या मानानें फारच कमी विचारपूर्वक झालीं. या देशांत युद्धकालीं लोकशाही सरकार नव्हतें. आणि तत्कालीन हिंदी सरकारास कांहीं वर्षें एका प्रमुख पक्षाचा विरोध सहन करून राज्यकारभार चालवावा लागला. तसेंच युद्धाचीं पहिलीं कांहीं वर्षें हिंदुस्थान प्रत्यक्ष समरांगणापासून बरेंच दूर राहणार अशी सरकारची कल्पना होती. युरोपीय व इतर पुढारलेल्या देशांत युद्धकालीन नियंत्रणांची घडण पहिल्या महायुद्धांतील अनुभव पूर्णपणें जमेस धरून करण्यांत आली व या नियंत्रणांची तयारी युद्धाच्या पूर्वकालांत किंबहुना युद्धाच्या पूर्वीच केली गेली. हिंदुस्थानांत यांपैकीं कांहींच घडलें नाहीं. पहिल्या महायुद्धांत इतर देशांनीं जो मार्ग स्वीकारला, त्याच मार्गानें हिंदुस्थान याही कालीं गेलें. म्हणजे केवळ प्रसंगोपात्त तांतडीची गरज भागविण्याकरितां नियंत्रणें बसविलीं व नवीन अडचणींमुळें तीं वाढविलीं. निरानिराळ्या नियंत्रणांत एकसूत्रीपणा आणण्याचा प्रयत्न कधींच केला गेला नाहीं. हा अनुभव सर्वच नियंत्रणांच्या बाबतींत आला. उदाहरणार्थ, अन्नाची प्रत्यक्ष टंचाई हिंदुस्थानांत कधींच भासणार नाहीं, असा समज युद्धाच्या पूर्वकालीं सरकारचा होता. ब्रह्मदेशांतून तांदुळाची आयात थांबणार, अशीं चिन्हें दिसूं लागल्यावरच या प्रश्नाकडे सरकारचें लक्ष वेधलें. अन्नप्रश्नाकडे झालेलें दुर्लक्ष हें धान्याचें सुरवातीचें भावनियंत्रण व गव्हाचें वांटप या बाबतच्या ढिलाईच्या धोरणावरून स्पष्ट होतें. आणि देशाची धान्यपुरवठ्याबाबतची दुःस्थिति सरकारच्या लक्षांत येण्याच्या आधींच बंगालच्या दुष्काळाची भीषण आपत्ति आपणांवर कोसळली. युद्धकार्याप्रीत्यर्थ लागणाऱ्या पैशाच्या व इतर वस्तूंच्या पुरवठ्याबाबत अशीच अनास्था दिसून येते. १९४२ पर्यंत युद्धासाठीं लागणारा खर्च फारसा वाढला नव्हता. आणि एकंदर किंमतीचें मानही माफक राहिलें होतें. परंतु जेव्हां १९४२ नंतर जपानी

युद्धाकरितां माल पुरविणें व हिंदुस्थान आणि इतर देशांचा युद्धाच्या वाढत्या खर्चाचा बोजा उचलणें आवश्यक झालें तेव्हां ही जबाबदारी नीटपणें पार पाडण्यास सरकार असमर्थ ठरलें. इतर देशांप्रमाणें मूलगामी योजना अमलांत आणण्यांत हिंदुस्थानांत कांहीं विशेष अडचणी होत्या. असें असलें तरी आपल्या युद्धकालीन राज्यकर्त्यांस परिस्थितीच्या बिकटपणाची यथार्थ जाणीव अगर इतरत्र सदृश परिस्थितींत योजलेल्या उपायांचें पुरेसें ज्ञान नव्हतें, हेंहि निर्विवाद आहे. किंबहुना १९४२–४३ पावेतों हिंदुस्थानसारख्या अवाढव्य देशांत तपशीलवार नियंत्रणें अमलांत आणणें बहुतेक वरिष्ठ अधिकाऱ्यांस अशक्यप्रायच वाटत होतें.

## भावनियंत्रणाचें धोरण

नियंत्रणांच्या पूर्वतयारीचा अभाव व त्यांची योजना घाईनें करण्याची आवश्यकता यांचे जोडीस आणखी एका गोष्टीची भर पडली. विशिष्ट महत्वाच्या वर्गांस दुखविण्याचें सामर्थ्य सरकारांत नव्हतें. या गोष्टीचा एकंदर किंमतीच्या मानावर फार परिणाम झाला. अन्नधान्याचे भाव ठरवितांना मध्यवर्ती सरकारला प्रांतिक सरकारांस तोंड द्यावें लागलें. राजकीय कारणांसाठीं पंजाबसारख्या जादा धान्योत्पादन करणाऱ्या प्रांतांतील जमीनदारांच्या अवास्तव मागण्यांना आळा घालतां आला नाहीं. यामुळें धान्याचें भावनियंत्रण व धान्यवसुली या बाबी बहुतेक प्रांतांत कधींच समाधानकारक होऊं शकल्या नाहींत. कारखानदार व खाणीवाले यांच्या मागण्याही त्यांच्या मालांच्या किंमतीबाबत मान्य कराव्या लागल्या. १९४२ सालीं व नंतरही बहुतेक महत्त्वाच्या पदार्थांचे भाव सरकारनें स्वतःच्या खरेदीपुरतेच नियंत्रित केले. उदाहरणार्थ, कापड, कोळसा, इत्यादि अतिमहत्त्वाच्या किंमती सरकारनें आपल्यापुरत्या जरी कांहीं प्रमाणांत नियंत्रित केल्या तरी बिनसरकारी व्यवहारांत त्या १९४२–४३ पावेतों पूर्णपणें अनियंत्रित ठेवल्या. पुढें चलनवृद्धि व तज्जन्य किंमतींची वाढ यामुळें युद्धप्रयत्नास धोका पोंचण्याची जेव्हां वेळ आली तेव्हांच भावनियंत्रण सरकारनें हातीं घेतलें. युद्धपूर्वकालीन किंमतींच्या पांचपटीनें कापडाच्या किंमती वाढल्यावरच त्या किंमती नियंत्रित करण्याचें सरकारास सुचलें. आणि नियंत्रण योजिलें तेंही कारखानदारांना पटेल व मानवेल असेंच. कापडाच्या किंमतींचें नियंत्रण कापडनियंत्रण–मंडळाच्या एका उपसमितीवर सोंपविलें; आणि या उपसमितींत गिरणीमालक बहुसंख्येनें असावेत, अशी योजना केली. कोळशाच्या नियंत्रित किंमतीही खाणीमालक बहुसंख्य असलेल्या सल्लागार मंडळाच्या विचारानेंच ठरविल्या. कोणत्याहि किंमती ठरवितांना उत्पादनखर्च, नफ्याचें प्रमाण इत्यादि मापनांचा उपयोग केला नाहीं. या किंमती कारखानदारांशीं वाटाघाटी करून ठरविलेल्या म्हणजे त्यांना अमान्य नसलेल्या अशाच होत्या. म्हणजे हिंदुस्थानांतील भावनियंत्रणाबाबतचें धोरण कॅनडा, इंग्लंड व अमेरिका या देशांतलि धोरणांहून अगदीं भिन्न होतें.

## किंमतींचें मान खूपच अधिक

युद्धाच्या शेवटीं आपल्या देशांतील नियंत्रणें जवळजवळ इतर देशांइतकी बहुविध होतीं. शिधावाटपाच्या योजनेचा अंमल विस्तृत क्षेत्रांत चालू होता आणि धान्यवसूलीच्या मोहिमेकडे बहुतेक इतर देशांपेक्षाही जास्त लक्ष पुरवावें लागत होतें. भांडवल उभारणें, आयात–निर्यात व्यवहार, मुख्य मुख्य शेतकी व औद्योगिक उत्पादनाच्या किंमती या सर्व नियंत्रित होत्या. तरीहि हिंदुस्थानांतील किंमतींचें मान तत्सम नियंत्रणें असलेल्या इतर देशांपेक्षां पुष्कळच अधिक होतें. सामान्य जनतेच्या राहणीचें मान बरेंच जास्त खालावलें. नफेबाजी इतर कोठेंही होती त्यापेक्षां कितीतरीपटीनें अधिक झाली आणि एकंदर नियंत्रणपद्धतींतील विस्कळितपणा हा विशेष उत्कटत्वानें दिसून येत होता. या सर्वांचें कारण म्हणजे आपल्या युद्धकालीन नियंत्रणाच्या उगमाचा व विकासाचा उपरिनिर्दिष्ट इतिहास. आपली नियंत्रणपद्धति बाह्यात्कारी इतर देशांसारखीच असली तरी तिची अमलबजावणी निराळ्या तऱ्हेनें झाल्यामुळें इतरत्र आढळून न येणारी निष्पत्ति तिच्यामधून झाली.

या देशांतील जनतेचा नियंत्रणाकडे पाहण्याचा दृष्टिकोण समजण्यासाठीं वरील विवेचन विस्तृतपणें केलें आहे. अजूनही बहुसंख्य जनतेची अशी समजूत

आहे कीं, नियंत्रणें उठविल्यानें सध्यांची हलाखी दूर होईल. सामान्य लोकच नव्हे तर उच्चपदाधिष्ठित लोकनेत्यांचाही असाच समज असल्याचें आढळून येतें. आपल्या देशांत असा सार्वत्रिक समज असणें एकप्रकारें फार आश्चर्यकारक आहे. कारण या देशांत सर्वच आर्थिक नियोजनाची आवश्यकता जोरानें प्रतिपादितात. आर्थिक व्यवहार पूर्णपणें खुले असावे असें कोणाचेंच—व्यापारी व कारखानदार यांचेंही—मत नाहीं. नियंत्रणपद्धति व आर्थिक नियोजन यांतील निकट संबंध मात्र कोणाच्या लक्षांत येत नाहीं.

## सर्वव्यापी नियंत्रणाची आवश्यकता

नियोजित आर्थिक प्रगति सर्वव्यापी नियंत्रणाशिवाय शक्य नाहीं. हा अर्थशास्त्राचा एक प्राथमिक सिद्धांत आहे. उदाहरणार्थ, 'मुंबई योजना' अमलांत आणण्याचें मनांत आणल्यास काय काय करावें लागेल हें पाहूं. ही योजना उदाहरणादाखल घेण्याचें कारण या योजनेच्या उत्पादकांवर समाजसत्तावादाचा किंवा सरकारी नियंत्रणाच्या पुरस्काराचा अरोप कोणी करणार नाहीं. राष्ट्रीय उत्पादन व सार्वजनिक रहाणीच्या मानाची वाढ ही मुंबई योजनेचीं उद्दिष्टें आहेत. ही योजना अंमलात आणवयाची असेल तर प्रथमतः आर्थिक उत्पादनाच्या वाढीकरितां वार्षिक उत्पादनांपैकीं किती बचत करावयाची हें निश्चित ठरवावें लागेल. नंतर निरनिराळ्या प्रकारच्या मालांच्या उत्पादनाच्या मर्यादा ठरवाव्या लागतील आणि या मालांच्या वांटपाची योजनाही निश्चित करावी लागेल. 'मुंबई योजने'प्रमाणें ठरविलेल्या उत्पादनाच्या मर्यादा पाळणें व मालाचें योग्य वांटप करणें हें सर्वव्यापी नियंत्रणाखेरीज शक्य होणार नाहीं. उत्पानाची वाढ नियोजित रीतीनें व्हावयाची तर भांडवल उभारणें व गुंतविणें या गोष्टींवर नियंत्रण ठेवणें आवश्यक आहे. तसेंच नवीन कारखान्याची स्थापना, जुन्याची वाढ व त्यांची योग्य स्थळीं उभारणी यांचेंहि नियंत्रण करावें लागेल. औद्योगिकवाढीच्या साधनांसाठीं आपण बहुतांशीं परदेशावर अवलंबून आहोंत. म्हणून आर्थिक नियोजन करण्याकरितां आयात व्यापाराचें कडक नियंत्रण करणेंही आवश्यक आहे. इंग्लंडवर ओढवलेल्या अलीकडील अरिष्टावरून परकी देशांत उपलब्ध असलेल्या पैशाचा विनियोग श्रीमंत देशासही किती काळजीपूर्वक करावा लागतो, हें दिसून येईल. हिंदुस्थानसारख्या गरीब देशाला तर दीर्घकालीन योजना पूर्ण करण्याकरितां परदेशांतील आपलें सांठलेलें भांडवल आणि परराष्ट्रीय व्यवहारांतील प्रतिवार्षिक बचत यांचा काटेकोरपणें उपयोग करणें विशेषच आवश्यक आहे. परदेशांतून यंत्रसामग्री व पक्का माल यांची कोणत्या प्रमाणांत आयात करावयाची एवढेंच ठरवून भागणार नाहीं. तर विशिष्ट उद्योगधंद्यांच्या सर्वांगीण वाढीसाठीं यांत्रिक व इतर साधनांच्या तपशीलवार याद्या कराव्या लागतील. प्रत्यक्ष उत्पादनावर यंत्रसामग्री वाढल्यावरही देखरेख ठेवावी लागेल. मोटारींचे कारखाने स्थापन करण्याबाबतच नव्हे तर त्यांतून उत्पादन कोणत्या प्रकारचें करावयाचें याबद्दलही योजना व नियंत्रण करावें लागेल.

आर्थिक योजना म्हणजे केवळ उत्पादन-योजना नव्हे. उत्पादनाचें नियोजित वांटप हें गरीब देशांत उत्पादनापेक्षांही महत्त्वाचें आहे. दर माणशीं कापडाचें सालीना उत्पादन पंधरापासून अठरापर्यंत वाढवावयाचें असल्यास वाढत्या उत्पादनासाठीं लागणारी यंत्रसामग्री उपलब्ध आहे एवढेंच पाहून भागावयाचें नाहीं. केवळ यंत्रसामुग्री वाढवून रहाणीचें मान वाढावयाचें नाहीं. सामान्य जनतेस हव्या असलेल्या कापडांत वाढ झाली आहे व तें त्यांस परवडणाऱ्या किंमतीस मिळत आहे हें पाहणें तितकेंच जरूरीचें आहे.

## युद्धोत्तर आर्थिक नियोजन अधिकच गुंतागुंतीचें

युद्धोत्तर आर्थिक नियोजन हें युद्धकालीन आर्थिक नियंत्रणापेक्षा जास्त गुंतागुंतीचें आहे. युद्धकालीन आर्थिक धोरणाचें एकमेव उद्दिष्ट म्हणजे युद्ध जिंकणें. युद्धकालांत कोणत्या पद्धतीनें नियंत्रण करावयाचें व कशास प्राधान्य द्यावययाचें हें ठरविणें फारसें कठीण नसतें. युद्धोत्तर कालांतील गोष्ट अशी नाहीं. कोणतीं उद्दिष्टें आधीं साधावयाचीं व कोणत्या उद्दिष्टास जास्त महत्त्व द्यावयाचें, हे प्रश्न युद्धोत्तर कालांत जास्त गुंतागुंतीचे होतात. तात्त्विक दृष्ट्या राष्ट्रीय संपत्तीची वाढ व जनतेच्या राहणीच्या मानांतील वाढ यांत परस्पर विरोध नाहीं. परंतु यांपैकीं

एकावरच विशेष भर दिल्यास तात्कालिक परिणामांत फार फरक दिसून येतो. राष्ट्रीय उत्पादन त्वरेनें वाढवावयाचें कीं जनतेच्या राहणीच्या मानांत वाढ करण्याकडे प्रथम लक्ष द्यावयाचें, हा प्रश्न क्रांतीनंतर रशियन राज्यकर्त्यांपुढें प्रामुख्यानें उभा होता. रशियांतील जनतेच्या राहणीचें मान क्रांतीनंतर वर्षींच वर्षे १९१४ सालापेक्षाहि कमी होतें असें म्हणतात. याचें मुख्य कारण रशियांतील आर्थिक नियोजनांत उत्पादन-वाढीस दिलेलें प्राधान्य. यांत्रिक उत्पादनांस आधारभूत असलेल्या प्रमुख उद्योगधंद्यांची संस्थापना व वाढ हेंच नियोजनाचें प्रमुख उद्दिष्ट मानल्यामुळें रशियन जनतेस राहणीचें निकृष्ट मान पत्करावें लागलें. हिंदी नियोजकासही याच प्रश्नाचा विचार करावा लागेल. मात्र तो रशियापेक्षा जास्त कठीण भासेल. उद्योधंद्यास लागणारी नैसर्गिक साधनसंपत्ति व लागवडीस न आणलेलें फार मोठें क्षेत्र हीं रशियांत उपलब्ध होतीं. या सर्व नैसर्गिक संपत्तीचा योग्य उपयोग करून घेण्यास भांडवलाचीच काय ती वाण होती. याकरितां पोटास चिमटा घेऊन रशियन लोकांनीं आवश्यक भांडवल त्वरेनें उभारण्याचें योजिलें. हिंदुस्थानांतील नैसर्गिक संपत्तिसाधनें रशियांपेक्षां कमी विपुल; आणि बचत करण्यास वाव जवळ जवळ नाहींच. येथील बहुसंख्य जनतेचें राहणीचें मान किती निकृष्ट आहे, हें बंगालच्या दुष्काळांतील मृत्युसंख्येवरून स्पष्ट दिसून आलें आहे.

## बुद्धिमान् वर्गाच्या विचारांतील गोंधळ

अमेरिकेसारख्या अत्यंत संपन्न देशांतच खुल्या व्यवहाराचें धोरण स्वीकारूनही विशेष आर्थिक हानि होत नाहीं. इतर कमी संपन्न देशांत सुव्यवस्थित नियंत्रणपद्धतीखेरीज शांततामय मार्गानें प्रगति होणें अशक्य आहे. स्वतंत्र हिंदुस्थानच्या आर्थिक योजनेचा विचार करतांना तो पार पाडण्यासाठीं आपणांस युद्धकालीन नियंत्रणें कायम ठेवावीं लागतील, एवढेंच नव्हे तर वाढवावींहीं लागतील हें लक्षांत ठेविलें पाहिजे. नियंत्रणपद्धतींत लादली जाणारीं बंधनें बहुतेकांस जाचक वाटतात. परंतु हल्लींच्या काळांत शांतता व सुरक्षितता प्रस्थापिणें एवढेंच शासनसंस्थेचें कर्तव्य नसून सामाजिक व आर्थिक उन्नतीचीही तिजवर जबाबदारी आहे. असें मानल्यास सामान्य जनतेच्या राहणीच्या मानांत अल्पही वाढ होण्यासाठीं बंधनें पत्करलीं पाहिजेत.

हिंदुस्थानांतील पांढरपेश्या वर्गावर याबाबतींत फार मोठी जबाबदारी आहे. आपल्या देशाची प्रगति शांततामय मार्गानें व्हावयाची कीं वर्गकलह अधिक तीव्र होऊन रक्तपात व्हावयाचा, हें या वर्गाच्या त्यागाच्या तयारीवर व समजूतदारपणावर अवलंबून आहे. आर्थिक योजनांच्या अंमलबजावणीची जबाबदारी बहुतांशीं या वर्गातील व्यक्तींवरच पडणार. सध्यां सर्वसामान्य सरकारी नोकरवर्ग कार्यक्षमहीं नाहीं व प्रामाणिकही नाहीं असें सर्वजण म्हणतात. त्याबरोबरच आपल्या व्यापारीवर्गास नीतिमत्तेची चाड नाहीं आणि जनतेस जबाबदारीची जाणीव नाहीं याबद्दलही दुमत नाहीं. सरकारी नोकर व व्यापारी लबाड आणि जनता दुबळी, हें मान्य केल्यास आपणास आशेस जागा उरणार नाहीं. आजची परिस्थिति जरी अशी दिसली तरी तिचा संबंध आपल्या मूळ स्वभावाशीं नाहीं. पुढारी आणि बुद्धिमान् वर्गाच्या विचारांतील गोंधळ व त्यामुळें जनतेची झालेली दिशाभूल यांचा हा परिपाक आहे. म्हणून आपणांपुढील आर्थिक प्रश्नांचें स्वरूप व ते सोडविण्याचें मार्ग यांचें यथार्थ ज्ञान मध्यम वर्गानें करून घेतलें पाहिजे व त्यांचा जनतेंत प्रसार केला पाहिजे.

## मध्यम वर्गाची जबाबदारी

आज आपण बहुतेक स्वतःस समाजवादी व समतावादी म्हणवितों. पूर्ण समाजवाद अमलांत आणणें तर राहोच परंतु आत्यंतिक विषमता किंचित् कमी करण्याकरितां केलेल्या प्रयत्नांचा प्रत्यक्ष परिणाम काय होईल याचा कितीजण विचार करतात ? आर्थिक विषमता कमी करण्याच्या प्रयत्नाचे परिणाम युद्धकालीन नियंत्रणांच्या अनुभवावरून स्पष्ट झालेले आहेत. जीवनावश्यक वस्तूंचें वांटप युद्धकालांत इंग्लंड व अमेरिकेंत सामान्यतः सुलभपणें होऊं शकलें यांचें कारण त्या देशांत युद्धपूर्वकालांतही मूलभूत जीवनावश्यक गोष्टींचा खप सर्व वर्गांत सामान्यतः सम प्रमाणांत होता. उलट हिंदुस्थानांतील परिस्थिति अगदी भिन्न असल्यामुळें वांटपपद्धति

बसविणें व चालविणें अवघड झालें. उदाहरणार्थ, साखर-वांटपाचा प्रश्न घ्या. निरनिराळ्या प्रान्तांत हा प्रश्न वेगवेगळ्या रीतीनें हाताळला आहे. मध्यप्रांतांत साखरेच्या वांटपाचें प्रमाण उत्पन्नावर अवलंबून असतें. ही पद्धत समतेच्या तत्त्वांशीं विसंगत आहे. मुंबई प्रांतांत साखरेचें वांटप उत्पन्नावर अवलंबून नाहीं; तर निवासस्थलावर म्हणजे लहान अगर मोठ्या शहरांत किंवा खेड्यांत राहण्यावर. ही पद्धत तितकी उघड उघड अन्यायाची नाहीं. परंतु ती पूर्णपणें तर्कशुद्धही नाहीं. वस्तुस्थिति अशी आहे कीं, आपल्याकडील दर माणशीं साखरेच्या खपाचें प्रमाण अत्यल्प असून बहुसंख्य गरीब वर्गांत तिचा उपयोग युद्धपूर्वकालीं जवळ जवळ नव्हताच. अशा परिस्थितींत साखरवांटपाची कोणतीही पद्धत अन्याय्य तरी ठरणार किंवा अव्यवहार्य तरी होणार. कापडवांटपाची हीच तऱ्हा. माणशीं दर सहा महिन्यांस मिळणारें दहा वार कापडही मध्यम-वर्गीय कुटुंबास अत्यंत अपुरें वाटतें. परंतु युद्धापूर्वी एकंदर हिंदुस्थानांत दरमाणशीं कापडाचा वार्षिक खप १६ वारच होता. याचें कारण असें कीं, आपल्या देशांतील किती तरी माणसांस वर्षास एक वारही कोरें कापड विकत घेणें शक्य नव्हतें. एवंच, जीवनावश्यक वस्तूंचें वांटप समाधानकारक होण्यापूर्वी उत्पन्नाच्या विभागणींतील आत्यंतिक विषमता नाहींशी होणें जरूर आहे. मध्यमवर्गीयांनीं आपल्या गरजा पुष्कळ कमी केल्या तरच गरीब वर्गाच्या राहणींत थोडी तरी सुधारणा होऊं शकेल.

मध्यम वर्गावरील आजची जबाबदारी दोन प्रकारची आहे. या देशांतील आर्थिक विषमता युद्धपूर्व इंग्लंडांत होती तितकी तरी कमी झाली पाहिजे. याकरितां मध्यम वर्गानें आपल्या मागण्या व आकांक्षा यांस पायबंद घातला पाहिजे. मध्यवर्ती पे-कमिशनपुढें पगाराबाबतच्या ज्या मागण्या केल्या गेल्या व ज्या त्या कमिशननें बहुतांशीं स्वीकारल्या, तितकें पगाराचें मान आपल्या देशास झेंपणें शक्य नाहीं. शिवाय नियंत्रण-नियोजनास लागणारा सुबुद्ध व प्रामाणिक नोकरवर्ग पुरविणें आणि सरकारी योजनांशीं मनापासून सहकार्य करणें हेंहि मध्यमवर्गीयांचें कर्तव्य ठरतें. या जबाबदाऱ्यांची योग्य जाणीव हिंदी मध्यमवर्गानें दाखविली नाहीं तर तो सध्यां संपत्ति व सत्तेच्या शिखरावर असलेल्या प्रतिगामी भांडवलदारांचा हस्तक ठरेल.

# तीन देवता

प्रेमा कंटक, बी. ए.

कलाकोविद रस्किन उत्कृष्ट चित्रकार होता, तसा कविहृदयीहि होता. एखादें रमणीय निसर्गदृश्य पाहिलें की तो लगेच तें रेखाबध्द किंवा शब्दबद्ध करून टाकी. अनंत विश्वाच्या विस्तारांत वैभवाला न्यूनता नाहीं. काव्य विषय अगणित आहेत. परंतु या जडसृष्टीपेक्षां चेतनसृष्टींतील सौंदर्य कांहीं कमी अलौकिक नसतें. तें पाहण्यास दृष्टि मात्र हवी. केवळ जडापेक्षां जडामधून विलसणारें चैतन्य पाहण्याची खुबी विशेषच म्हटली पाहिजे. आणि तें रेखाबद्ध किंवा शब्दबद्ध करण्यास प्रतिभासंपन्न कलावंतच पाहिजे. तशी शक्ति या लेखिकेंत संपूर्ण-पणें आहे असा तिचा दावा नाहीं. लेखणी हें हृदयांतील अमूर्त भावांचें वाहन बनावें व तिच्या द्वारां सत्य तत्त्वाचें स्वतःस प्रतीत झालेलें दर्शन इतरांसही करवून शिवाचा सहोदर जो आनंद त्याचा अनुभव सर्वांस आणून द्यावा हीच सत्यशोधकाची आंतरिक लालसा असणार. खालीं दिलेलीं शब्द-चित्रें वाचून एखादा साहित्यरसिक नाक मुरडील असेंही संभवतें. पण माझी जीवननिष्ठा पुष्कळदां विलक्षण वाटणाऱ्या पद्धतीनें लक्षवेधक विषय शोधून काढते. मी स्वतः कलावंत नसलें तरी कलारसिक आहे असा माझा दावा आहे. कलेंतून जीवनदर्शन झालें पाहिजे. अर्थात् जीवनाचें अनंत क्षेत्र संपूर्णतः अथवा विभागशः कलेचा विषय होऊं शकतें. कलाविषयाचा जीवनहेतु आपल्या लक्षांत आला नाहीं तरी त्याचा प्रभाव आपल्या जीवनाला उन्नति-पोषक ठरला तरीसुद्धा कलेला स्फूर्ति येते.

## 'दया भूतेषु'

सामाजिक सेवेच्या अखंड प्रवाहांत वहात असतां निसर्गाशीं संबंध फार थोडा येतो. मानवी सृष्टीशीं अधिक अनुसंधान बांधलें जातें. त्यामुळें याच सृष्टीनें माझ्या जीवनावर अधिक परिणाम केला आहे. या सृष्टींतील हालचाली, क्रिया–प्रतिक्रिया, प्रेम आणि द्वेष, आसक्ति आणि वैराग्य, चुका आणि सुधारणा, पुरुषार्थ आणि बलिदान या सर्वांचे संस्कार मजवर होत आले आहेत. पण मला हेंही कबूल केलें पाहिजे कीं भोंवतालच्या सृष्टीप्रमाणें माझें हृदय विशाल नाहीं. जरी कोणतीहि व्यक्ति मला कधीं क्षुद्र वाटली नाहीं आणि एखाद्या व्यक्तीचा उन्मादक पुरुषार्थ समाजघातक झाला व तिच्या कृतीबद्दल तिरस्कार वा संताप आला तरी तिचे अहित चिंतण्याची वृत्ति माझ्यांत नाहीं. तथापि सदोष वाटणाऱ्या व्यक्तीबद्दल नापसंती मनांत असतेच. " दया भूतेषु " हा फारच मोठा सामा-जिक गुण आहे. धर्मबुद्धीच्या जोडीला हा गुण विकास पावूं शकला नाहीं तर साधकाची वृत्ति वरीं-चवरी कर्मकांडी व म्हणून असहिष्णु बनते, हें सत्य मी बुद्धीनें जाणूं शकतें. पण तें माझ्या प्रकृतींत मात्र अद्यापपर्यंत पूर्णतया रुजलें नाहीं. त्यामुळें या बाब-तींत माझा गुरु बनणाऱ्या व्यक्तीविषयीं मला अधिक आकर्षण व प्रेम वाटतें खरें.

## स्त्रियांकडून प्रेरणा

माझ्या जीवनविकासास कारणीभूत होणारी फार मोठी व्यक्ति ही माझा पहिला गुरु होय. ती व्यक्ति

पुरुषवर्गांतील आहे. हा एक अपवाद सोडला तर माझ्यावर बालवयापासून खोल संस्कार करणाऱ्या व्यक्ती बहुतांशीं सर्व स्त्रियाच आहेत. मृत आणि जिवंत स्त्रियांनीं मला नेहमींच संस्कार दिले आहेत, आदर्श निर्माण करण्यांत व माझें चारित्र्यबळ वाढविण्यांत मदत केली आहे. कांहीं स्त्रियांनीं प्रत्यक्ष, तर कांहींनीं अप्रत्यक्षपणें, मला सदाचाराची व मानवतेची दीक्षा दिली आहे. स्त्रीजातीची सेवा करण्याची प्रेरणासुद्धां स्त्रियांकडूनच मिळाली. आत्यंतिक निष्ठा व कुर्बानीचें काव्यही त्यांनींच शिकविलें. शून्यवत् बनण्यांचा आदर्शही त्यांनींच माझ्यासमोर ठेविला. सहकारी जीवनांतील रमणीयता व सुवास त्यांनींच दाखविला. ज्या ज्या सन्नारींनीं हें शिक्षण दिलें, त्या सर्वांची मोजदाद या मर्यादित लेखांत करणें शक्य नाहीं. जीवनांत जसजसे प्रसंग येत जातील तसतसे त्यांशीं संबद्ध असे लेखविषय चर्चिण्यास मला संकोच वाटणार नाहीं. आज प्रसंगानुरोधानें तीन महिलांचीं शब्दचित्रें रेखाटण्याची इच्छा होत आहे. ही घटनाहि अगदींच आकस्मिक नाहीं. एका स्नेही सज्जनांशीं जीवनाविषयक चर्चा करीत असतांना माझ्या जीवनावर आपापल्यापरी परिणाम करणाऱ्या तीन भगिनींचा नामनिर्देश झाला व त्यांतून माझे आंतरिक भाव प्रकट झाले, तसा त्या भगिनींबद्दलही सुखसंवाद झाला. त्यांतूनच या लेखाची कल्पना जन्मास आली. हा लेख केवळ मनोविनोद म्हणून लिहिला जात नाहीं. हें केवळ आत्मलक्षी लिखाणही नव्हे. स्त्रीरूपांत प्रकट होणाऱ्या शक्तीचा हा पूजाप्रकार आहे. तो वेगळ्या रूपांत अवतरला आहे. समुद्राच्या लाटांप्रमाणें तिघीही समान अधिकाराच्या आहेत. कोणालाच प्राधान्य नाहीं. पण आपापल्या वैशिष्ट्यानें त्या माझ्या आकर्षणाचें केन्द्र होऊन बसल्या आहेत.

## पुण्याबद्दलचें त्यावेळचें मत

मी जेव्हां मुंबईत शिक्षण घेत होतें तेव्हां अठरापगड जातींच्या मुलींशीं व पर्यायानें स्त्रियांशीं संबंध येत असे. मुंबईची स्वतःची अशी प्रांतीयता नाहीं; जातीयताही नाहींच. आम्हां विद्यार्थिनींच्या मनावर सर्वसाधारणपणें पुण्याबद्दल व पुण्यांतील लोकांबद्दल प्रतिकूल संस्कार होते, एवढें आठवतें. मुंबईत कोकणस्थ—देशस्थ—कऱ्हाडे, विशेषतः कोकणस्थ स्त्रियांशीं संबंध आला कीं तो दुःखदायक होई, असेंहि आठवतें. त्यांचें सोंवळें-ओवळें, ठसक्यानें बोलण्याची पद्धति, वागण्यांतील ताठरपणा व कुर्रेबाजपणा, स्वजातीयांशिवाय इतरांकडे हलक्या दृष्टीनें पाहण्याची वृत्ति यांचा आम्हांस राग येई. सर्वसाधारणपणें आम्ही या स्त्रियांना 'भटणी' म्हणत असूं. त्यांच्या पुरुषांस 'भट' किंवा 'भटुरडे' ही पदवी देत असूं. महाराष्ट्राची राजधानी पुणें, व तें तर या 'ब्राह्मणी' संस्कृतीचें केन्द्र. तेव्हां पुण्यांतील 'भटुरडे' व 'भटणी' फारच कुचकट व क्षुद्र वृत्तीचे असतात, हें आमचें सर्वसाधारण मत त्यावेळीं होतें.

म्हणून मी जेव्हां १९३४ सालीं महाराष्ट्राच्या राजधानींत प्रवेश केला, तेव्हां मानवी हृदयाचा अनुभव वाढला होता तरी जुने संस्कार अगदींच पुसट झाले नव्हते. कर्मधर्मसंयोगानें पुण्यांतील पहिल्याच निवासांत 'भटणी'च्या सोंवळ्याकडून धक्के मिळाले. महात्माजींच्या सहवासांत राहून असे धक्के शांत व तटस्थ राहून सहन करण्यास मी शिकलें होतें, त्यामुळें त्याचें कांहीं विशेष वाटलें नाहीं. परंतु त्यावेळीं परिचय घडून आलेल्या कोणाही स्त्रीनें मला आकर्षिलें नाहीं, हेंही खरें.

## सुशीलाबाईंची भेट

अगदीं याच वेळीं माझा आचार्य जावडेकरांशीं परिचय झाला. त्यांच्या घरीं झालेली पहिली भेट मला आठवते. त्यांच्या पत्नीला माझ्या भेटीसाठीं आंत बोलावणें गेलें. थोड्याच क्षणांत एक देखणी व सुशील रमणी आपल्या सदभिरुचीचा व सौजन्याचा आविष्कार करीत तेथें प्राप्त झाली. तिच्या मुखावर शांति विलसत होती. पावलें शांत पडत होतीं. तिच्या नेत्रांत मला अकृत्रिमतेचा गौरव दिसला व मी मुग्ध झालें!

त्यानंतर सुशीलाबाईंचा सहवास मला अधिकाधिक मिळत गेला. तसतसें त्यांच्यासंबंधीं माझें आकर्षणही वाढत गेलें. त्यांच्यांत कोणतें वैशिष्ट्य मला दिसलें तें एका वाक्यांत स्पष्ट करतां येणार नाहीं. माझी अशी कल्पना आहे कीं, माझ्या प्रकृतीशीं त्यांच्या प्रकृतीचें मुळींच साम्य नव्हतें—

दोघींची प्रकृति परस्परविरुद्ध होती. त्यामुळेंहि त्यांचें वैशिष्ट्य मला भासलें असेल. पण हेंही सांगितलें पाहिजे कीं केवळ भिन्न किंवा परस्पर-विरोधी वृत्तीमुळें आकर्षण निर्माण होतेच असें नाहीं. व्यक्तिमत्त्वसुद्धां प्रभावी असावें लागतें. ज्या तीन भगिनींची शब्दचित्रें या लेखांत येणार आहेत, त्यांचा माझ्याशीं असलेला प्रकृतिभेद आपापल्यापरी प्रभावी आहे आणि हेंच त्यांच्याबद्दल मला वाटणाऱ्या आकर्षणाचें कारण असावें.

समजूं लागलें तेव्हांपासून मी ध्येयवादी बनलें आणि महात्माजींच्या मार्गदर्शनाखालीं अहिंसेची उपासना करीत आलें. पण उपासना केली म्हणून ती कांहीं लौकर प्रसन्न झाली नाहीं. माझ्या प्रकृतींत क्रोधाचा प्रवेश खोलवर आहे, असहिष्णुताही भरपूर प्रमाणांत आहे. या सर्वांची जाणीव मला आहे व म्हणून मी वांचलें आहे. पण म्हणून हे दोष ज्यांच्या ठायीं नाहींत, त्यांच्याविषयीं मला नितांत आदर वाटतो. या बाबतींत स्त्रियाच माझ्या गुरु झाल्या. ज्या ज्या स्त्रियांची प्रकृति अहिंसक— नुसती दुर्बळ अहिंसक नव्हे तर प्रभावीपणें अहिंसक— दिसून येते, त्यांचेंच वजन मजवर पडतें. विशेष परिचयानंतर सुशीलाबाईंच्या स्वभावांत ही शक्ति असल्याचें मला दिसून आलें. त्यामुळें मी त्यांना पूजूं लागलें. त्या एका तत्त्वज्ञान्याच्या पत्नी आहेत, त्यांच्यांत उत्कट सेवाभाव आहे, त्या निरलस व भल्या आहेत, या सर्व गोष्टी खऱ्या असल्या तरी माझ्या उग्र प्रकृतीवर वजन पाडण्याइतक्या या गोष्टी खास शक्तिशाली नाहींत. ज्यांच्या सहवासांत असतांना मी कधींच क्षुब्ध होत नाहीं, त्यांचाच प्रभाव माझ्यावर पडतो.

## आर्यस्त्रीची मूर्ति

सुशीलाबाई ब्राह्मण संस्कृतींत वाढल्या आहेत. त्यामुळें त्यांच्या जीवनांतील हालचालींना कांहीं मर्यादा पडल्या आहेत. त्यांच्या शारीरिक दुर्बलतेनें त्यांच्या शक्तीस आणखी मर्यादा घातल्या आहेत. 'लोक-शक्ति' पत्राचें पहिलें प्रकाशन झालें, त्यानंतर आपल्या संपादक पतीसमवेत त्या पुण्यांत होत्या. त्यावेळीं पुण्यांतील स्त्रीसेवासंघाच्या चिटणीस म्हणून त्यांनीं निष्ठेनें व निरलसपणें काम केलें. त्या काळांत मी वेळोवेळीं पुण्यास येई, तेव्हां मुक्कामास त्यांच्याकडेच असे. सार्वजनिक कार्यांत येणाऱ्या अडचणींशीं सामना करतांना, मत्सर, असूया, अविश्वास, झोंडपणा, अन्याय इत्यादिकांपासून त्रास सोसावा लागत असतांना, त्यांनीं आपल्या अंगची असाधारण सहिष्णुता दाखविल्याचें मला स्मरतें. त्यांच्या अंगीं अहिंसा प्रकृतिरूपानेंच वसत असल्या-मुळें नम्रताही भरपूर आहे. या गुणांच्या जोडीस अंतःकरणाची कोमलता बसविली म्हणजे आर्य स्त्रीची मूर्ति पूर्ण झाली. सुशीलाबाईंत स्त्रीजातीचा विशेषेंकरून सुसंस्कृत स्त्रीचा मुख्य गुण जो "ऱ्ही" तो प्रकर्षानें दिसून येतो. ऱ्ही हा गुण नैतिक शक्तींतून निर्माण होतो. अनार्य आचरण ऱ्हीशीं विसंगत आहे. याच गुणामुळें व्यक्तीला समाजांत प्रतिष्ठा मिळते. ऱ्हीमान् व्यक्तिच अनार्य वृत्तीच्या समाजपीडक व्यक्तीला शासन करूं शकते. अशा व्यक्तीच्या सान्निध्यांत कोणीही स्वैर वर्तन करूं शकत नाहीं. सुशीलाबाईंच्या स्वभावांत शांति ही स्थायीस्वरूपांत वसली आहे. त्यांच्या विश्ववादी पतीच्या सान्निध्यांत अस्पष्ट, अव्यक्त कल्याणेच्छा हृदयांत बाळगणारी ही शांत देवीमूर्ति विरोधा-भासानें शोभते. पति विरक्तदशेंत, पुष्कळदां राज-कीय मतप्रणालीच्या अभिनिवेशांत येऊन क्षुब्धही होतात. त्यांची ज्ञानपिपासा तर सुशीलाबाईंची सपत्नी होऊन बसल्याचा भास होतो. परंतु सुशीला-बाई त्याच्या उलट उपाधिरहित, संयत भावना— युक्त प्रेमाची शांत मूर्ति वाटतात; त्यांची भाषा निसर्गसहज वाटते; सारें बुद्धिवैभव पतीनें आपल्या वांट्यास घेऊन फक्त कर्मकौशल्याचा वांटा त्यांचेकडे दिला आहे असा भास होतो. अर्थात् हें कर्म-कौशल्य कित्येक वर्षें घराच्या चतुःसीमेंत बंदिस्त आहे. समाजाचें चारित्र्य वाढविण्यासाठीं ज्या मंगल मूर्तींची आवश्यकता नित्य भासते त्यांपैकीं एक सुशीलाबाई आहेत असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं.

## तादात्म्य आणि ताटस्थ्य

सुशीलाबाईंत आणखी एक वैशिष्ट्य मीं पाहिलें. त्यांच्यांत तादात्म्य आणि ताटस्थ्य या परस्परविरोधी वाटणाऱ्या वृत्तींचें सुंदर मीलन झालें आहे. पतीच्या जीवनाशीं व भावनांशीं त्यांचें पूर्ण तादात्म्य झालें



अणुक्रमणिका

आहे. आपल्या शारीरिक दुर्बलतेचा विचारसुद्धां न करतां त्यांनीं स्वतःस दमेकरी पतीच्या सेवाशुश्रूषेस पूर्णपणें वाहून घेतलें आहे. मॅट्रिकपर्यंत झालेलें शिक्षण, फुलांप्रमाणें कोमल व मधाप्रमाणें मधुर शब्दांनीं सभा जिंकण्याची असलेली शक्ति, सामाजिक कर्तव्यें पार पाडण्यासाठीं आवश्यक असें कर्तृत्व, या सर्व गोष्टींची देणगी त्यांचेजवळ असूनसुद्धां, त्यांनीं आपल्या पतीच्या स्वास्थ्यासाठीं आत्मविलोपन करून घेतलें आहे. पतीची सेवा व कुटुंबाची धारणा यांतूनच त्यांची तपस्या प्रकट होत असते. सूर्याशीं प्रभा, तशा पतीशीं सुशीलाबाई अभिन्न भावानें वसत असतात. पतीच्या बुद्धिमत्तेबद्दल, विचारप्रणालीबद्दल त्यांच्या मनांत नितांत आदर आहे. शिष्येप्रमाणें त्यांनीं पतीपासून ज्ञानप्राप्ति करून घेतली आहे. पण त्या तदाकार वृत्तींत केवळ भावनेची उत्कटता नसून ताटस्थ्यही अलौकिक प्रकारचें आहे. राजकारणी पुरुषांच्या स्त्रिया आपापल्या पतींच्या मताबद्दल फारच पक्षपात बाळगतात; हिरिरीनें त्यांच्या मताची तारीफ, समर्थन व प्रचार करितात. त्यांच्या विचारसरणींतील दोष इतरांनीं प्रामाणिकपणें व्यक्त केल्यास मुळींच सहन करीत नाहींत; उलट पतिमताचें खंडन ऐकल्यास पतिद्रोहाचें पाप लागेल अशी वृत्ति दाखवितात. सुशीलाबाईमध्यें असा आग्रहीपणा मुळींच नाहीं. पतीशीं मतभेद असलेल्या व्यक्तींची मनोरचना, त्यांचे आदर्श व भावना याबद्दलही त्यांच्या मनांत आदरयुक्त प्रेम दिसून येतें. कोणाचींही मतें त्या तितक्याच गोडीनें, समोरच्या व्यक्तीला पूर्ण विश्वास व मोकळेपणा वाटेल इतक्या तन्मयतेनें ऐकत असतात. तीं त्यांना पटलीं नाहींत तरी त्या तोडून टाकणार नाहींत. मार्दवपूर्ण युक्तिवाद करतील. त्या स्वतंत्रपणें व जागृतपणें सूक्ष्म निरीक्षण व विचार करूं शकतात. त्यांची स्वतःची अशी एक दृष्टि असूं शकते. पतीच्या त्या आंधळ्या शिष्या नाहींत. शिष्याचें व्यक्तित्व नष्ट झालें तर गुरूचाही पराजय झाला नाहीं काय ? म्हणूनच पतीच्या रागद्वेषाचे विषय किंवा आग्रह-निग्रह त्यांना माहीत असले तरी त्यांची दुसरी बाजू जेव्हां त्यांच्यासमोर मांडली जाते, तेव्हां चर्चेंतील साधक युक्तिवाद व प्रमाणें त्यांना पटल्यास त्या तात्काल आपलें सहमत दर्शवितात. मग तें त्यांच्या पतींच्या मताविरुद्ध कां जाईना ! त्यांच्या वृत्तींत एकांगीपणा नाहीं. पतिजीवनाशीं तादात्म्य असूनही त्या तटस्थ वृत्तीनें पतीच्या मतांचें परीक्षण करूं शकतात. त्यांचे सिद्धान्त, अनुमानें किंवा निर्णय अबाधित नाहींत, हेंही समजूं शकतात. तथापि त्यांची मुख्य प्रवृत्ति जो गृहव्यवसाय त्यांत त्या इतक्या तन्मय होऊन गेलेल्या असतात कीं, त्या त्या वेळीं ऐकलेले दोन्ही पक्षांचे युक्तिवाद त्यानंतर संपूर्णपणें व सहज विसरून जातात ! निरोगी व सुखी मनाचा हा एक पुरावा होय.

## तानूबाईंचें घर म्हणजे एकनाथांचें घर

सुशीलाबाईंचा नित्य सहवास मला फार घडला नाहीं. पण आमच्या सासवडच्या प्रेमळ सहकारिणी सौ. तानूबाई मोजे, ज्यांनीं तुरुंगांतसुद्धां माझी सोबत केली, त्यांचें वर्णन कोठच्या शब्दांत करावें ! तानूबाई वाण्याचा धंदा करणाऱ्या एका सामान्य गृहस्थाच्या पत्नी आहेत. पतीचें शिक्षण फायनलपर्यंत झालेलें. पत्नीला लिहितां वाचतां मुळींच येत नव्हतें. त्या मजजवळ शिकल्या. पतीचा घरसंसार त्या पहाताताच; पण दुकानदारींतहि मदत करतात. अगदीं बहुजनसमाजाच्या गाभ्यांतून त्यांचा जन्म झाला. त्यांची भाषा, संस्कार व विचारही बहुजनसमाजाचेच आहेत. कितीही शिकविलें तरी "मी करील, ती करीन" असेच शब्दप्रयोग त्या करतात. पण त्यांचें हृदय इतकें उन्नत आणि बोली इतकी गोड व प्रौढ आहे कीं, त्यांच्याजवळ कितीहि वेळ जरी बसलें तरी उठावेंसें वाटत नाहीं. त्या बाईलाहि मीं कधींच रागावतांना पाहिलें नाहीं. रागावलेल्यांचा राग ती शांत करूं शकते, एवढें मात्र तिचें सामर्थ्य आहे. परिणामीं तिच्या सहवासांत मलाही सहजच शांत राहतां येतें. तानूबाई मोठ्या ध्येयवादी नाहींत. पण निरीक्षण केल्यावर त्यांचें जीवन निश्चितपणें त्यांना कोठें तरी उंचावर नेत आहे असें वाटतें. त्या विद्वान् नाहींत. पण त्यांच्या शब्दांतून निष्पाप मनाचीं श्वसनें व उदार हृदयाचीं स्पंदनें प्रतीत होत असतात. त्या सार्वजनिक सेवेचीं कामें करीत असल्या तरी घरांतच वावरल्याप्रमाणें वागतात; इतकी त्यांची निरहंकार वृत्ति आहे. "हें काम

घरचें व तें लोकांचें" अशी जाणिवच त्यांना असलेली दिसून येत नाहीं. सार्वजनिक जीवनास वाहिलेल्या व्यक्ती आपलें कौटुंबिक जीवन सोडून सार्वजनिक जीवन स्वीकारल्याबद्दल स्वतःचें अतोनात स्तोम माजवतात. तानूबाईंना कौटुंबिक व सार्वजनिक असा भेदच माहीत नाहीं. त्यांचें घर एकनाथांचें घर बनलें आहे. सासवडांत त्यांच्याबद्दल सर्व स्त्रीपुरुषांना विलक्षण आदर व आत्मीयता वाटते. सासवड म्युनिसिपालिटींत स्त्रियांच्या राखीव जागेसाठीं उभें राहण्याचा प्रसंग त्यांच्यावर आला तेव्हां त्यांनीं अट घातली कीं, "स्पर्धेला दुसरी स्त्री उभी राहणार नसेल तरच मी उभी राहीन."

## माझी 'तारणहार' देवता

त्यांचे पति श्री. बबनशेट त्यांचे मित्र व साथी आहेत. तानूबाईच्या विकासाला व कर्तृत्वाला त्यांनीं पूर्ण वाव दिला आहे. लग्नाला इतकीं वर्षें झालीं तरी अगदीं नवनिच लग्न झालेल्या वराप्रमाणें ते तानूबाईवर आजही अनुरक्त आहेत. बबनशेटजींच्या सर्व कामांत व जबाबदाऱ्यांत तानूबाईची विशेष मदत तर असतेच. पण जेथें पतीचें धैर्य विचलित होतें, तेथें पत्नी श्रद्धेची व निश्चयाची मूर्ति बनून त्याला धीर देते. दोघेंही पतिपत्नी नगरपालिकेंत निवडून आलीं, दोघेंही तुरुंगांत गेलीं. मागें त्यांच्या गैरहजेरींत कुटुंबावर वाईट प्रसंग आले. वृद्ध वडील दम्यानें अत्यवस्थ झाले. दीर क्षयानें आजारी पडला. कुटुंबावर आर्थिक आपत्ति आली. वडिलकीच्या जबाबदारीमुळें बबनशेटना पॅरोल घेऊन बाहेर यावें लागलें. पण तानूबाईंनीं दृढतापूर्वक पॅरोल घेण्याचें नाकारलें. त्यांना परमदुःख झालें होतें. पण त्यांनीं धैर्यानें स्वतःचे अश्रु बाहेर दिसूं दिले नाहींत. मला मात्र माहीत होतें कीं, ती प्रेमळ साध्वी रात्रीं बिछान्यावर मूक अश्रुमोचन करीत असे. तुरुंगांतही त्यांनीं प्रसन्न वृत्तीनें सर्वांची सेवा करून वातावरणांत आनंद व पावित्र्य यांचा सुवास पसरविला. त्या प्रबुद्ध स्त्रीच्या शक्तीचा प्रत्यय मला अनेकवार आला आहे व तिच्या सद्गुणसुवासानें मला मुग्ध केलें आहे. जे कोणी स्त्रीपुरुष तानूबाईच्या सान्निध्यांत येतात, त्या सर्वांना त्यांच्याबद्दल आदर वाटतो. मजवर त्यांचें अतिशय प्रेम आहे. परंतु माझे दोषही त्यांना दिसतात व जेव्हां ते दिसतात तेव्हां ते दर्शविण्याची त्यांची हातोटी देखील अद्भुत असते. तुरुंगांत तानूबाई मजवर संख्याप्रमाणें देखरेख करीत होत्या. म्हणून पुष्कळ क्षोभजनक प्रसंगांतून मी वांचलें. त्या जवळ असल्या म्हणजे मला एकप्रकारें आश्वासन मिळतें. त्यांच्या प्रेमसरितेंत माझा क्रोधाग्नि विझून जातो. तो पेट घेऊंच शकत नाहीं. मला क्रोध येईल अशा कोणत्याही प्रसंगीं तानूबाई स्वतः मध्यें पडून मला दूर काढून लावतात. प्रसंगचातुर्यानें बचावून नेण्याची त्यांची विलक्षण पद्धति आहे. त्यामुळें तानूबाई माझी 'तारणहार' देवता आहे असें मी नेहमींच मानीत आलें आहे.

## सत्यभामाबाई

वरील दोन भगिनींप्रमाणेंच तिसरी एक भगिनीही आपल्या अंगच्या गुणवैशिष्ट्यानें मला आकर्षित करती झाली. पुण्यांतील डॉ. लागू यांच्या पत्नी सौ. सत्यभामाबाई यांचा माझा ओझरता परिचय होता. परंतु खरा निकटवर्ती परिचय वैयक्तिक सत्याग्रहकालांत तुरुंगांत झाला. सुशीलाबाईप्रमाणें त्याही ब्राह्मण संस्कृतींत वाढलेल्या आहेत. तसें पाहिलें तर वरील तिघीही महिला पतिपरायण साध्वी आहेत; शांतस्वभावी, प्रेमळ व सेवापरायण आहेत. पण साम्य येथेंच पुरें होतें. तानूबाईंनीं आपल्या पतीहून वेगळें व स्वतंत्र असें आपलें व्यक्तिमत्त्व सिद्ध केलें आहे. शरीरश्रम करण्याची त्यांची शक्तिही पुष्कळ आहे. त्यांचा धीटपणा असाधारण आहे. सर्व दर्जांच्या स्त्रीपुरुषांत त्या मिसळूं शकतात, बोलूं शकतात, सल्लामसलत देऊं शकतात. ही गोष्ट या ब्राह्मण संस्कृतींत वाढलेल्या भगिनींच्या बाबतींत शक्य नाहीं. त्यांचे संस्कार वेगळे आहेत.

## 'गृहस्थी' नव्हे 'गृहस्थाश्रम'

सत्यभामाबाईंच्या ठिकाणीं बालपणीं अंतःस्थ बंडखोर वृत्ती होत्या किंवा नाहीं तें मला माहीत नाहीं. आजच्या कालांत तरी त्यांच्या वृत्तींतील शम आणि उपशम यांच्या योगानें त्यांची एकंदर प्रकृति आदर्श जीवनास अनुकूल झालेली दिसून

येते. त्यांचे पति श्री. जावडेकरांप्रमाणें प्रखर बुद्धीचे व आग्रही वृत्तीचे तत्त्वज्ञानी नाहींत. उलट पत्नीच्या शांतशीतल स्वभावास जुळून येण्यासारखीच त्यांचीही वृत्ति व प्रकृति आहे. त्या दोघांच्या प्रकृतीची छाया त्यांच्या साऱ्या कुटुंबावरही पडली आहे. त्यामुळें कौटुंबिक शम प्रस्थापित झालेल्या या संघांतील प्रत्येक व्यक्ति सामाजिक सेवेस लागेल तर सामाजिक शम प्रस्थापित करण्याच्या कामीं ही केवढी मोठी साधना होऊं शकेल, असें मला कधीं कधीं वाटतें. कुटुंब किंवा समाज यांचा विकास करावयाचा असेल, त्यांचें बळ वाढविण्याची इच्छा असेल, तर दोन विशेष गोष्टींवर भर दिला पाहिजे. या संस्थांतील घटक चारित्र्यवान् असले पाहिजेत व त्यांच्यांत व्यापक प्रमाणावर सहकार असला पाहिजे. चारित्र्यदुर्बल माणसें किंवा संकुचित सहकार यांनीं इष्ट तो परिणाम होणार नाहीं. सत्यभामाबाईंच्या कुटुंबांत या दोन्ही गोष्टी मोठया प्रमाणावर दिसून येतात. त्यामुळें घरांत सर्वत्र खानदानी अनुभवास येते. तेथें केवळ 'गृहस्थी' चालत नाहीं. "गृहस्थाश्रम" चालतो. भोग आणि ऐश्वर्य यांचें प्राबल्य नाहीं तर स्वतःच्या सेवारूप तपश्चर्येचें फल समाजजीवनांतच विलीन व्हावें, अशी सत्यभामाबाईंची एकंदर वृत्ति दिसून येते. सुशीलाबाईइतकें त्यांचें शिक्षण झालें नाहीं. पण त्यांची जीवनसंस्कृति उच्च प्रकारची आहे. पतीच्या विपत्तिकालांत सत्यभामाबाईंनी त्यांना सोबत केली आहे. त्यांच्या सर्व धर्मकर्मांत त्यांना मदत केली आहे. त्यांची राहणीकरणी व विचारसरणि ह्यांशीं त्या समरस झाल्या आहेत. त्या स्वतः कारावासांतही जाऊन आल्या आहेत. सकृद्दर्शनीं असें वाटतें कीं, सत्यभामाबाई पतीच्या पावलांवर पावलें टाकीत असतात. पण पुष्कळ दिवसांचा परिचय व निरीक्षण यामुळें मला असें वाटूं लागलें आहे कीं, सत्यभामाबाईंच्या अंगच्याच कित्येक गुणांचा प्रभाव त्यांच्या पतीवर पडला आहे व नकळत त्यामुळें त्यांचें जीवन उन्नत झालें आहे. स्वयंपाकघरापासून डॉक्टरांच्या उठण्याबसण्याच्या खोलीपर्यंत प्रत्येक वस्तूवर सत्यभामाबाईंची छाप पूर्णपणें दिसून येते. डॉक्टर कितीही उशीरां जेवायास येवोत, खुद्द सत्याभामाबाईसुद्धां सर्वांची जेवणें झालीं असलीं तरी देखील त्यांना पतीच्या ताटाजवळ येऊन बसावेंच लागतें. तीं दोघें याप्रमाणें जवळ बसून सुखसंवाद करीत असतांना तें दृश्य पाहणें पवित्र व आनंददायक वाटतें. एरवीं तरी अविभक्त कुटुंबपद्धतींत जबाबदार पतिपत्नींना परस्परांतील वैवाहिक संबंधाचा मोठया प्रमाणांत त्याग करावा लागतो. दोघे किंवा एक जरी व्यक्ति समाजसेवेस वाहिलेली असली तरी त्यागाचें क्षेत्र अधिकच विस्तृत होतें. जेथें अविभक्त व समाजसेवी कुटुंब आहे तेथें पतिपत्नीच्या अंगच्या (व त्यामुळें कुटुंबांतील इतर घटकांच्या अंगच्या) सामाजिक सद्गुणांचा विकास वाढत जातो.

## अतिथिसत्कार हा एक 'गृह्य संस्कार'

डॉ. लागूंचा व्यवसायही सामाजिक सेवेलाच पोषक आहे ही देखील अनुकूल बाब आहे. त्यामुळें सत्यभामाबाईंना वैयक्तिक व कौटुंबिक सुखाचाही वारंवार होम करावा लागतो. पण त्यामुळें त्यांची वृत्ति दिवसेंदिवस अधिकाधिक धर्मप्रेरित व उदार होत आहे. अतिथिसत्कार हें एक त्यांच्या घरांतील वैशिष्ट्य आहे. स्व. जमनालाल बजाज यांनींही मोठ्या प्रमाणावर अतिथिसत्कार करण्याची व्यवस्था केली होती. एक खातेंच त्यांनीं निर्माण केलें, त्यासाठीं इमारत बांधली, भोजनशाला उभारली, नोकरवर्ग निर्माण केला व खूप द्रव्य खर्चिलें. पण तसा प्रकार लागूंच्या घरीं नाहीं. तेथें अतिथिसत्कार हा एक गृह्यसंस्कार आहे. गृहस्थाश्रमींच्या पंचमहायज्ञांपैकींच तो एक असल्याप्रमाणें भासतें. अतिथींच्या आसपास घरगुती वातावरण राहतें.

## संस्कारी मुग्धता

या सर्व प्रापंचिक जबाबदाऱ्या संभाळून सत्यभामाबाई सामाजिक घटनांकडे देखील लक्ष पुरवितात. वर्तमानपत्रें त्या नियमानें वाचतात. सूतकताई घरीं नेमानें तर करतातच पण सामुदायिक प्रसंगींही चुकवीत नाहींत. सभांनाही हजर असतात. त्यांनीं कधीं व्याख्यान दिलेलें स्मरत नाहीं. पण ऐकलेल्या व्याख्यानांतील मर्म त्या ग्रहण करून त्यावर अनुकूल प्रतिकूल टीकाही करूं शकतात. त्यांच्यांत तीव्र प्रकारची जिज्ञासा आहे पण समुद्राप्रमाणें गांभीर्यही आहे. मोजकें बोलणें हा

त्यांचा मोठा गुण आहे. त्यांच्या थोड्या शब्दांत पुष्कळ अर्थ भरलेला असतो. त्यांची संस्कारी मुग्धता चार मंडळींत त्यांना देवीची ध्यानमूर्ति बनविते. लज्जेचें पावित्र्य त्यांच्या मुखावर नित्य विलसत असतें. शरीरानें अबला, हृदयानें कोमल, नेहमीं आत्मस्थित दिसणारी अशी स्त्री नारीप्रतिष्ठेची मूर्तिच वाटते. त्यांना स्वतःच्या स्वाभाविक गुणांचें भान नसतेंच. परंतु त्यांच्या लज्जेचें कवच इतकें कठीण आहे व धर्मपरायणता इतकी शांत, संयत आणि मंगल आहे कीं, त्यांच्यासमोर अशिष्ट बोलणें वा वागणें अशक्यच. त्यांचें प्रेम व्यापक आहे, संकुचित नाहीं. ज्या व्यक्तीमुळें सर्वसाधारण कोणाहीं व्यक्तीचें कपाळ उठेल, सहनशक्ति कुंठित होईल व संताप येईल, अशा व्यक्तींनाही उदारपणें सामावून घेण्याची शक्ति त्यांच्यांत आहे. ज्यांच्यांत मानवतेची भावना वरच्या कोटीस पोहोंचलेली असते, त्यांनाच वेदांताच्या भाषेंतील करुणा व मैत्री या दैवी गुणांची संपत्ति प्राप्त होते व अशा संपत्तीनें युक्त अशा विभूति व्यक्तींतील परिस्थितिजन्य किंवा जन्मजन्य बाह्य दोषांकडे दुर्लक्ष करून आत्माभिमुख होऊन आंतील भावात्मक रस घेऊं शकतात. ही वृत्ति शमप्रधान असते यांत शंकाच नाहीं. सत्यभामाबाईंच्या आसपास भिन्नप्रकृति अशा अनेक व्यक्ति येतात पण जातांना प्रसन्न होऊन जातात. सत्यभामाबाईंना समत्व साधलें आहे असें मला वाटतें. हा गुण त्यांनीं कमावला आहे कीं ईश्वरानें त्यांना ती देणगी दिली आहे, तें माहीत नाहीं. पण त्यांच्या सान्निध्यांत मला ग्रीष्मऋतूंत आम्रवृक्षाच्या छायेखालीं बसल्यानें मिळणारी शीतलता मिळत असते खरी!

## तिन्ही महिलांचें वैशिष्टय

मागें म्हटल्याप्रमाणें या तीनही महिलांनीं आपापल्या गुणवैशिष्ट्यानें मला आकर्षिलें आहे, मजवर आपला प्रभाव पाडला आहे. तिघींतही कर्तव्यदक्षता आहे, शांति आहे, शक्ति आहे. त्यांच्यांत नाहीं म्हणजे रोष. क्रोध किंवा आवेश यांचें यत्किंचितही दर्शन न करवतां त्या भोंवतालच्या स्खलनशील व्यक्तींना शासन करून वळण देऊं शकतात. त्यांच्या शांत जीवनाचाच आघात परिणामकारक होतो असें मला वाटतें. तरवार तापवल्यानें तिची धार बोथट होते. थंड पोलादच मर्मभेदी घाव घालूं शकतें. शब्दांनीं वा प्रत्यक्ष ताडन केल्याशिवाय नुसत्या इशाऱ्यानेंच चुकणाऱ्यांना सुधारणें व पुन्हां त्यांच्या-बद्दलची आदरबुद्धि व प्रसन्न वृत्ति कायम ठेवणें हिला मी मोठीच शक्ति समजतें.

## स्त्रियांविषयींची द्विविध दृष्टि

हें सारें शब्दचित्र वाचून कोणी असें म्हणेल कीं, या सामान्य व्यक्तिच आहेत. घरोघरीं अशा बायका अनेक सांपडतील. संभव आहे कीं, बबन शेटजींचा अपवाद सोडला तर इतर दोघे पति आपापल्या पत्नींकडे "ही पत्नीच आहे" या पलीकडे इतर कोणत्याही भावनेनें पहात नसतील. सर्वसाधारणपणें पुरुषांची स्त्रियांकडे पहाण्याची हीच द्विविध दृष्टि असते. एकतर आपली आई, बहीण, पत्नी यांचेकडे पाहातांना नात्यांत अभिप्रेत असलेल्या अर्थापेक्षां दुसरा अर्थ त्यांस माहीत नसतो. इतर स्त्रियांबद्दल "परस्त्रिया" या भावनेमुळें पहाण्याची दृष्टि नुसती उदासीनतेचीच असते. त्या स्त्री-आकृतीच्यामागें आत्मविकासी भूमिका घेणारी, प्रज्ञा व श्रद्धा यांचा सुंदर समन्वय साधणारी, त्यागाची अमाप शक्ति धारण करणारी एक जीवनज्योति अखंड तेवत आहे, हें पुरुषांच्या बहुधा लक्षांत येत नाहीं. आपल्या कौटुंबिक जबाबदाऱ्या, संकटें, चिंता, आकांक्षा आणि छंद यांच्या आवरणाखालीं अगोदरच प्रच्छन्न असलेली ज्योति ते पुरी झांकून टाकतात; इतकी कीं, तिच्या किरणांचें क्षीण तेजही बाहेर येऊंच शकत नाहीं. अथवा दुसऱ्या पक्षीं तिला आपल्या मृगयाशीलतेचें लक्ष्य बनवून तिला भीरु, मूर्ख, क्षीण व अबला बनवितात. दोन्हीही दृष्टि त्याज्यच आहेत. कितीही सुशिक्षित, तत्त्वज्ञानी समतेचे भोक्ते म्हणविणारे "पुरुषवर" असले तरी त्यांची स्त्रियाबाबत भूमिका स्वाभाविक या दोहोंपैकीं एक असते.

## स्त्रीचा स्वतंत्र जीवन-संदेश

पतीसाठीं स्त्रीनें तपाचरण केलेलें माहीत आहे. पण रमणीसाठीं पुरुषानें महातप केलेलें कोठेंच ऐकिवांत नाहीं. स्त्री वीर्यशुल्का असते, तपःसाध्य नसते अशीच पुरुषांची भावना सर्वत्र दिसून येते. यामुळेंच



अणुक्रमणिका



रमणीची आत्मगौरवाची भावना क्रमानें नष्ट होत गेली व तिच्या पराक्रमाला स्वतंत्र क्षेत्र राहूंच शकलें नाहीं. "अनाश्रया न शोभन्ते पण्डिता वनिता लताः ॥" या म्हणींत तिला स्थान मिळालें. तिच्या पातिनिष्ठेबद्दल तरी तिचें कौतुक होऊं लागलें किंवा अपवादरूपानें पुरुषांच्या हिंसक वृत्तीचा अंगिकार करून रणांगणावर पराक्रम गाजवला तर तिची तारीफ होऊं लागली. तिच्या स्वतंत्र प्रकृतींतून ती एक स्वतंत्र जीवनसंदेश जगाला देऊं शकते असें पुरुषांस वाटत नाहीं. असो. या मर्यादांमुळें स्त्रीच्या शक्तीला पुरता वाव मिळत नाहीं. तिच्यांतील अहिंसावृत्तीचा, शमाचा, पवित्रतेचा, त्यागाचा जर सामाजिक पायावर विकास होईल, तर मानवी समाजांत आश्चर्यकारक क्रांति होऊं शकेल असें मला वाटतें. त्या दृष्टीनें वरील तीनही महिला समाजांतील शुभंकर देवता आहेत. समाजांत अशा देवता घरोघर वावरूं लागतील, तेव्हांच अभ्युदय व मांगल्य यांचें साम्राज्य मेदिनीवर पसरेल.

---

# रत्नाकर आणि वसुंधरा

[ सुनीत–सुमंदारमाला ]

महासागरा ! दाटली ही तुझीया तरंगावली सर्व अंगावरी
जणूं लाभलीं लोचनें रोमरोमीं तुला काय हीं त्या सुरेंद्रापरी ?
असंख्यात ह्या काय रे लोचनांनीं धरेच्या स्वरूपा अधाशापरी
अहोरात्र घेतोस न्याहाळुनी कीं, म्हणूं चाटिशी कीं जिभा ह्या तरी ?

अशा पापण्या मोड-मोडून किंवा वटारून डोळे दटावून कां
कधीं उग्र थैमान वेळीं-अवेळीं पिसाटा पहातोस घालून का ?
तिच्या पावलांशीं जरी ओतिशी रे, तुझ्या रत्नराशी तिला काय त्या ?
तुवां ऊर फोडूनिया गायिलेल्या तिला ऐकुं येती कुठें आरत्या ?

हजारो करीं घेउनी फेनमाला, शिरीं बांधुनी आणि मुंडावळ्या
तिन्ही काळ तूं सज्ज होसी,—गळोनी पडायास त्यांच्या पुन्हां पाकळ्या !
अरे मस्तवाला, कधीं दांडगाई करोनी तिच्या घेसि अंगा झटे
अशा वाकुल्यांनीं अशा क्रीडितांनीं सतीची कधीं वृत्ति कां पालटे ?

धरेला निदिध्यास तेजोनिधीचा, जिवाचें तिच्या ध्येय हो जीवन
कशीं चेष्टितें गर्जितें प्रेमिकांचीं परावृत्तिला व्हायचीं कारण ?

—यशवन्त



अणुक्रमणिका

